


जन्मशताब्दी

२००४-२००५ स्मृती सौरभ २३

# केनोपनिषद



प्रा.द.ना. दुभाषी

## ।। आशीर्वाद ।।



प. पू. श्री. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी
सिद्धगिरी मठ, कणेरी

।। वंदे श्री सिद्धराम - काडसिद्धेश्वराभ्याम् ।।

# केनोपनिषद

प्रा. द. ना. दुभाषी

**मुद्रण :**
देविका आर्ट प्रिंटर्स

**मुखपृष्ठ :**
समीर अक्षेकर/माधव लाड

**मुद्रीत शोधन :**
श्री. ज्ञानेश्वर भालेकर

**अक्षरजुळणी :**
ओंकार कॉम्प्युटर्स, डोबिंवली

**आवृत्ती पहिली :**
मार्च - २००५

**मुल्य : रु. ६०/-**

**प्रकाशक :**




**सिद्धगिरी गुरुकुल फाऊंडेशन**
**कणेरी, कोल्हापूर**

## प्रस्तावना

इ. स. २००४-२००५ हे वर्ष प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांनी त्यांचे सद्‌गुरू प. पू. काडसिद्धेश्वर महाराज यांचे जन्मशताब्दी वर्ष वेगळ्या स्वरूपात साजरे करण्याचा संकल्प सोडला आहे. विविध विषयांवरील १०० ग्रंथ प्रकाशित करण्याचा हा संकल्प, पारमार्थिक क्षेत्रातील परमपावन आणि ज्ञानी पुरुषाची स्मृती जागविण्याच्या दृष्टीने अत्यंत मंगल, पवित्र आणि उचित असाच म्हणावा लागेल. या ग्रंथाच्या माध्यमातून समाजमनाचे विविध विषयांत प्रबोधन होणार आहे. विचारकक्षा रुंदावणार आहेत. आजअखेर अनेक विचारवंतांची पंधरापेक्षा अधिक पुस्तके प्रकाशित झाली आहेत.

प्रा. द. ना. दुभाषी यांचे या परमपवित्र संकल्पातील भगवद्‌गीतेवरील अत्यंत सुलभ भाषेतील भाष्य 'सर्वांसाठी गीता - एक जीवनग्रंथ' हे पाच खंड ग्रंथरूपाने प्रकाशित झाले आहेत. पारमार्थिक क्षेत्रात साधना करणाऱ्या नव्या आणि जुन्या साधकांना या ग्रंथातील मार्गदर्शन अत्यंत मोलाचे ठरणार आहे. वाचकांनी या ग्रंथांचे उत्स्फूर्त व भव्य स्वागत केले आहे. त्या ग्रंथाचा प्रकाशन-विमोचन सोहळा अजून विस्मरणात गेला नाही. तोच त्यांचे 'ईशावास्योपनिषद' आणि 'केनोपनिषद' हे दोन ग्रंथ पारमार्थिक क्षेत्रातील वाचकांच्या भेटीसाठी आले आहेत. प्रा. दुभाषी हे कोल्हापुरातील एक नामवंत महाविद्यालयातील इंग्रजी विषयाचे विद्यार्थीप्रिय प्राध्यापक (निवृत्त) म्हणून या परिसराला सुपरिचित आहेत. आपल्या इंग्रजी विषयाच्या व्यासंगाबरोबरच संतसाहित्याचा त्यांचा व्यासंग फार मोठा आहे. श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा, श्रीमद् भगवद्‌गीता हे त्यांचे जिव्हाळ्याचे विषय आहेत. या विषयांवर त्यांनी हजारोंपेक्षा अधिक प्रवचने दिली आहेत. वारकरी संप्रदायातील अनेक साधक त्यांची प्रवचने श्रवण करून मंत्रमुग्ध होतात. त्यांची वाणी अत्यंत रसाळ व शुद्ध आहे. त्यांचे या ग्रंथावरील विवेचन, कठीण परमार्थ अत्यंत सोपा करून सांगणारे असते.

ज्ञानेश्वरीतील 'कर्मयोग' आणि 'भक्तियोग' साध्या आणि सोप्या भाषेत असंख्य श्रोत्यांपर्यंत पोहोचविण्याचे अत्यंत पवित्र काम आपल्या रसाळवाणीद्वारे त्यांनी चालू ठेवले आहे. श्रीमद् भगवद्‌गीता आणि ज्ञानेश्वरीतील निवडक ओव्यांवरील त्यांची लेखमाला कोल्हापुरातून पारमार्थिक क्षेत्राला वाहिलेल्या

मासिकातून वाचकांपर्यंत पोहोचली आहे. लोकांना ती भावली आहे.

'ईशावास्योपनिषद' आणि 'केनोपनिषद' हे त्यांचे ग्रंथ आध्यात्मिक क्षेत्रातील साधकांना आत्मज्ञान करून घेण्यासाठी अत्यंत उपयुक्त ठरतील. या ग्रंथातील त्यांची भाषा सर्वसामान्य साधकांनादेखील उमजेल इतकी सोपी आणि सुबोध आहे. या ग्रंथावर अनेक अधिकारी पुरुषांनी लिखाण केले आहे. पण त्या ग्रंथांत त्यांनी वापरलेल्या शास्त्रीय आणि पांडित्यपूर्ण भाषेमुळे ते ग्रंथ सामान्य माणसाच्या बुद्धीच्या आवाक्याबाहेरचे आहेत. प्रा. दुभाषींचे या ग्रंथावरील विश्लेषण समाजातील सर्व थरांतील पारमार्थिक साधकांना प्रकाशसंदायिनी ठरणारे आहे. बोधाची साधी, सोपी व रसाळ भाषा अतुलनीय आहे. या ग्रंथामुळे अनेक साधकांचे जीवन पारमार्थिक ऐश्वर्याने विभूषित होईल याबद्दल खात्री वाटते.

प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांनी ज्या हेतूंनी हा संकल्प सोडला आहे, तो पुरा होण्यासाठी हे ग्रंथ निश्चितपणे फलदायी ठरतील. या ग्रंथाच्या प्रकाशन सोहळ्याच्या निमित्ताने ग्रंथकारांनी आणि प्रकाशकांनी प्रस्तावना लिहिण्याचे अत्यंत कठीण काम माझ्यावर सोपविले आहे, हेच मी माझे भाग्य समजतो. या ग्रंथाच्या वाचकांना अनेक शुभेच्छा. प्रा. दुभाषींच्या आगामी ग्रंथलेखनासाठी शुभेच्छा!

**ह. भ. प. प्रा. बाळकृष्ण आनंदराव चौगले**
कसबा बावडा,
कोल्हापूर

दि. ९ फेब्रुवारी २००५

# लेखकाचे मनोगत

पूज्य स्वामी विवेकानंदांनी गीता, वेद व उपनिषदे यांचा प्रसार पाश्चिमात्य देशांमध्ये हिरिरीने केला. प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानाचे श्रेष्ठत्व त्यांनी सिद्ध केले. उपनिषदातील तत्त्वज्ञानाने स्वतः स्वामी विवेकानंद खूप प्रभावित झाले होते. स्वामी विवेकानंद म्हणतात, ''वेदज्ञानाच्या या सारभूत अंशाचे नाव वेदान्त वा उपनिषदे असे आहे. तो वेदांचा अंतिम, सारभूत भाग आहे. उपनिषदामधील उच्च आध्यात्मिक आणि तात्त्विक सत्येच प्रतीक-प्रतिमांच्या मूर्त, स्थूल रूपात आज आमच्या घरोघरी पूजिली जात आहेत.

वेदान्ताची ही तत्त्वे अरण्यातच अडकून न पडता ती समाजात आली पाहिजेत. ती केवळ गुहेत न राहता न्यायालयात, प्रार्थना मंदिरात, गरिबांच्या झोपडीत प्रविष्ट झाली पाहिजेत. प्रत्येक स्त्री-पुरुष, बालक-बालिका मग त्यांचा व्यवसाय कोणताही असो, ते कोठेही असोत, त्या सर्वांसाठी वेदान्त-उपनिषदे ही उपयुक्त आहेत,'' असा विवेकानंदांचा आग्रह होता.

अशीच भावना प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामींनी व्यक्त केली. किमान दहा उपनिषदांचे मौलिक तत्त्वज्ञान, सोप्यात सोप्या पद्धतीने, सामान्यातल्या सामान्य माणसापर्यंत पोहोचवावे अशी इच्छा त्यांनी व्यक्त केली. स्वामीजींच्या प्रेरणेने व प्रोत्साहनाने, ज्ञानसागरात डुंबायला लावणारी व विलक्षण आनंद देणारी ही गोष्ट मी स्वीकारली.

स्वामीजींच्या कृपाशीर्वादाने त्यातील पहिले 'ईशावास्योपनिषद' व दुसरे 'केनोपनिषद' पूर्ण झाले आहे. 'ईश' हे आकाराने लहान व अर्थाने महान असे उपनिषद आहे. या ईशोपनिषदाचा प्रभाव राष्ट्रपिता महात्मा गांधींवरसुद्धा एवढा होता की, त्यांनी विनोबा भावेंकडून आग्रह करून त्याचा भावार्थ लिहून घेतला.

पूज्य विनोबा भावे पहाटेच्या प्रार्थनेत हे ईशोपनिषद नेहमी म्हणत असत. साधकाची समग्र साधना त्यात थोडक्यात आलेली असल्यामुळे, प्रातःस्मरणाला ते उपयोगाचे आहे अशी त्यांची धारणा होती. या उपनिषदाबद्दल विनोबा म्हणतात -

'ईशोपनिषद माझ्या हृदयाला अवर्णनीय समाधान देते. माझी सकाळची प्रार्थना त्यानेच होते. त्याचे कित्येक मंत्र गूढवत् भासतात, परंतु माझ्याशी ते मोकळ्या मनाने गोष्टी करतात.'

'खरोखरच ईशोपनिषद नव्हे तर इतर उपनिषदांतसुद्धा अनेक गूढ, विवादात्मक व विविध मत-मतांतरे असलेली ठिकाणे बरीच आहेत. माझी भूमिका ही उपनिषदावर भाष्य करण्याची नाही. वादविषयातील क्लिष्ट, अनावश्यक भाग टाळून, उपनिषदातील सुंदर तत्त्वविचार, सोप्यात सोपे करून सांगण्याचे माझे उद्दिष्ट आहे. संस्कृत न जाणणाऱ्यांनासुद्धा सहज समजेल व गोडी लागेल अशा पद्धतीने, कोठेही तत्त्वविचारांशी तडजोड न करता, संपूर्ण विषय मांडण्याचा हा प्रयत्न आहे.'

मनुष्याचा जन्म सफल होण्यासाठी व कृतार्थ होण्यासाठी आत्मज्ञानाची आवश्यकता आहे, असा सर्व उपनिषदांचा सारभूत संदेश आहे. ईशावास्योपनिषदात तेजस्वी जीवनाचे मंत्र ऋषींनी सांगितले आहेत. असे जीवन कसे जगावे, याचे मार्गदर्शनही केले आहे. भोग व त्याग, प्रवृत्ती व निवृत्ती, सुख-दुःख अशा संघर्षातून सहयोगात्मक समतोल कसा साधायचा याचे नेमके रहस्य उलगडून दाखविले आहे. हे उपनिषद जिज्ञासूंना, साधकांना तसेच पारमार्थिक मार्गावर वाटचाल करणाऱ्या सर्वांनाच अचूक व विधायक दृष्टी देणारे आहे.

उपनिषदातील या शुद्ध, पवित्र विचारांनी आपले जीवनसुद्धा परिपूर्ण व्हावे, या शक्तिशाली विचारांनी सर्वांचा नैतिक, आध्यात्मिक व भौतिक विकास व्हावा, केवळ ज्ञानप्राप्ती नव्हे तर त्या ज्ञानाने आपले जीवनसुद्धा सुंदर व्हावे.

प.पू. स्वामींनी सुरू केलेला हा ज्ञानयज्ञ याचसाठी आहे. ज्ञानानेच मनुष्याच्या जीवनात शांती, सुख, समाधान प्राप्त होते. 'ईशावास्योपनिषद' व 'कनोपनिषद' हा त्याचाच एक भाग आहे.

**– प्रा. द. ना. दुभाषी**
कोल्हापूर

रत्नोदय सोसायटी,
२४६ अ/ई, नागाळा पार्क, कोल्हापूर.
(फोन : (०२३१) २६५१०४४
५६१२३८१

## ।। ग्रंथदान ।।

**शतेषु जायते शूरः सहस्त्रेषु च पण्डितः ।**
**वक्ता दशसहस्त्रेषु दाता भवती वा न वा ।।**

वरील सुभाषितात म्हटल्याप्रमाणे, दाता भेटण ही खरोखरच फार दुर्मिळ बाब आहे. एका सत्पुरुषाने दात्याला साक्षात देवाची उपमा दिली आहे, ते म्हणतात, "देव व दाता यात अंतर ते कोणते?"

परंतु जगद्गुरु काडसिद्धेश्वर महाराजांच्या आशीर्वादातून व प.पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांच्या आचरणरुपी प्रेरणेतून एखादा दाता नावारुपाला येण यात विशेष ते काय! पाठीवर कृपा करणारा हात असेल तर पुढे जाण्यात वेगळीच मजा असते.

श्री. निर्मल सातोस्कर यांनी या पुस्तकासाठी अर्थदान करुन गुरुमाऊलीची कृपा संपादन केली आहे. 'केनोपनिषद' हे २३वे ग्रंथपुष्प त्यांच्यातर्फे गुरुचरणी अर्पण!

प्रकाशक
सिद्धगिरी गुरुकुल फाऊंडेशन
कणेरी, कोल्हापूर

# अनुक्रमणिका



# केनोपनिषद

## केनोपनिषदाचे स्वरूप व महत्त्व

उपनिषदांचे अध्ययन करणाऱ्या सर्व साधकांसाठी केनोपनिषदाचे महत्त्व अनन्य साधारण आहे. या उपनिषदाचा प्रारंभ 'केन' म्हणजे कोणी अथवा कुणाद्वारे अशा शब्दाने होत असल्याने त्यास केनउपनिषत् असे नाव प्राप्त झाले आहे. कुणाद्वारे मन इंद्रियादी जड गोष्टी परिचालित होतात या मूलभूत प्रश्नाने या उपनिषदाची सुरुवात झाली आहे. आपण पाहतो, बोलतो, ऐकतो, मनाने अनेक गोष्टी करतो, या शरीराच्या सर्व हालचाली कुणामुळे घडतात? या मागे कुणाची सत्ता आहे? व ते जे तत्त्व आहे ते जाणावयाचे कसे? या मूलभूत प्रश्नांचा शोध या उपनिषदात घेतला आहे. चैतन्यस्वरूप सर्व व्यापी सर्वाधार परब्रह्माचे स्वरूप यात स्पष्ट करण्यात आले आहे. 'केनेशितम् पतति प्रेषितम् मनः' या शिष्याच्या मनात उद्भवणाऱ्या प्रश्नाचे उत्तर आचार्यांनी दिले आहे. सर्व जड पदार्थांच्या मागे असणाऱ्या सूक्ष्म आत्मतत्त्वाची उकल या उपनिषदाने केली आहे. मानवी मनामध्ये असे प्रश्न वारंवार निर्माण होत असतात व अशा सत्याचा शोध जेव्हा लागतो त्या वेळी मनुष्याचे जीवन सफल व कृतार्थ होते.

आचार्य श्रीमत शंकराचार्यांनी यावर दोन भाष्ये रचली आहेत. त्यामुळे केनोपनिषदाचे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने विशेष महत्त्व सिद्ध झाले आहे. शंकराचार्यांनी या उपनिषदाचा निर्देश 'तलवकार उपनिषद' या नावाने केला आहे. कारण हे उपनिषद सामवेदाच्या तलवकार शाखेचे उपनिषद असून जैमिनीय उपनिषद ब्राह्मण ग्रंथांचा भाग म्हणून ते उपलब्ध आहे. एकाच आचार्याने एकाच सिद्धांताचा पाठपुरावा करणारी दोन भाष्ये लिहिल्याचे दुसरे उदाहरण क्वचितच आढळेल. हे उपनिषद केवळ परमतत्त्वाचे शब्दज्ञान करून देत नाही तर कथेच्या रूपाने त्याचे श्रेष्ठत्वही पटवून देते. उमेच्या कथेच्या द्वारे या परम सत्याचे दर्शन घडवून त्याला प्राप्त करण्याचा मार्गही यात दाखवला आहे.

या उपनिषदात गुरुशिष्यांच्या प्रश्नोत्तररूप संवादाचे गद्य पद्यात्मक स्वरूप आले आहे. हे चार खंडांचे उपनिषद आहे. त्यातील पहिले दोन खंड हे श्लोकबद्ध असून तृतीय व चतुर्थ खंड हे गद्यमय स्वरूपाचे आहेत. या उपनिषदात एकूण ३४ मंत्र असून पहिल्या दोन खंडांत अनुक्रमे ८ व ५ असे एकूण १३ मंत्र आहेत. तृतीय व चतुर्थ खंडात अनुक्रमे १२ व ९ असे एकूण २१ मंत्र आले आहेत. जगाच्या उत्पत्तीचे व एकूण व्यवहारांचे रहस्य कथन करणाऱ्या या उपनिषदाच्या पहिल्या दोन खंडांत आत्म्याचे अस्तित्व सिद्ध केले असून अंतिम दोन खंडांमध्ये जगाचे आद्य मूळ आत्मा आहे असे सिद्ध केले आहे. निसर्गातील प्रत्येक घटनेमागे आणि मनुष्याच्या सर्व व्यवहारामागे ब्रह्माची शक्ती असून ते सत्य जाणणे म्हणजे अमृततत्त्व प्राप्त करणे असा संदेश या उपनिषदाने दिला आहे. परमात्म्याचे हे बोध स्वरूपत्व अत्यंत कमी शब्दात पण उत्कटतेने मांडले आहे. या उपनिषदात ब्रह्माचे श्रेष्ठत्व कथन करण्यासाठी अग्नी, वायू, इंद्र आणि हैमवती उमादेवी यांची एक आख्यायिका सांगितली आहे. या आख्यायिकेत यक्ष ही संज्ञा ब्रह्म या अर्थाने उपयोजिली आहे. या ब्रह्मापेक्षा श्रेष्ठ अशी दुसरी कोणतीही शक्ती नाही असे प्रतिपादिले आहे. हैमवती उमादेवीचा निर्देश इतर उपनिषदांत आढळत नाही. इंद्र गुप्त झाल्यानंतर आकाशात यक्ष प्रगट झाले आणि तेथेच हैमवती उमादेवी प्रगट झाली असे वर्णन या उपनिषदात आले आहे.

केनोपनिषदाचे स्वरूप हे असे आहे.

## शान्तिमंत्र

**ॐ आप्यायन्तु ममाङ्गानि वाक्प्राणश्चक्षुःश्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च सर्वाणि। सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मां ब्रह्म निराकरोत्, अनिराकरणमस्त्वनिराकरणं मे स्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ।**

**ॐ शान्ति! शान्ति!! शान्ति!!!**

**मम अङ्गानि वाक्, प्राणः, चक्षुः, श्रोत्रम्, अथो बलम्, सर्वाणि इन्द्रियाणि च आप्यायन्तु । सर्वम् औपनिषदं ब्रह्म (अस्ति) अहं ब्रह्म मा निराकुर्याम् । ब्रह्म मा मा निराकरोत् । (तस्य) अनिराकरणम् अस्तु । मे अनिराकरणम् अस्तु । तदा ये उपनिषत्सु धर्माः ते आत्मनि निरते मयि सन्तु।**



## अर्थ

माझे (हात - पाय इत्यादी) अवयव बलवान असोत, तसेच माझी वाणी, प्राण, डोळे, कान, इत्यादी इंद्रिये बलवान असोत. हे सर्व उपनिषदांनी सांगितलेले ब्रह्म आहे. मी ब्रह्म दूर न सारो. मला ब्रह्म दूर न करो. (आम्ही एकरूप असो) अशा प्रकारे आमचे परस्पर 'अनिराकरण' असो, उपनिषदांत कथन केलेले धर्म (आत्मज्ञानरूपाने) माझ्या ठिकाणी राहोत. त्रिविध तापांची शांती असो.

000

ॐ

# केनोपनिषद

## शान्तिमंत्र

ॐ आप्यायन्तु ममाङ्गानि वाक्प्राणश्चक्षुःश्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च सर्वाणि। सर्व ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मां ब्रह्म निराकरोंत, अनिराकरणमरत्वनिराकरणं मे स्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ।

ॐ शान्ति! शान्ति!! शान्ति!!!

## प्रथम खंड

केनोषितं पतति प्रेषितं मनः केन प्राणः प्रथमः पैति युक्तः ।
केनेषितां वाचमिमां वदन्ति चक्षुः श्रोत्रं क उ देवो युनक्ति ।।१।।

श्रोतस्य श्रोतं मनसो मनो यद्वाचो ह वाचं स उ प्राणास्य प्राणः ।
चक्षुषश्चक्षुरतिमुच्य धीराः प्रेत्यास्मॉंल्लोकादमृता भवन्ति ।।२।।

न तत्र चक्षुर्गच्छति न वागच्छति नो मनो न विद्यो न विजानीमो
यथैतदनुशिष्याद् अन्यदेव तद्विदितादथो अविदिताद् अधि ।
इति शुश्रिम पूर्वेषां ये नस्तद्व्याचचक्षिरे ।।३।।

यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।४।।

यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम् ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।५।।



यत्वक्षुषा न पश्चति येन चक्षूँषि पश्चति ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।६।।

यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदँश्रृतम् ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।७।।

यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्रणीयते ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।८।।

## द्वितीय खंड

यदि मन्यसे सुवेदेति दभ्रमेवापि
नून त्वं वेत्थ ब्रह्मणो रुपम् ।
यदस्य त्वं यदस्य दैवष्वथ नु
भीमा स्यमेव ते मन्ये विदितम् ।।१।।

नाहं मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च ।
यो नस्तद्वेद तद्वेद नो न वेदेति वेद च ।।२।।

यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ।
अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम् ।।३।।

प्रतिबोधविदितं मतममृतत्वं हि विन्दते ।
आत्मना विन्दते वीर्यं विद्यया विन्दते मृतम् ।।४।।

इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः ।
भूतेषु भूतेषु विचित्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ।।५।।

## तृतीय खंड

ब्रह्म ह देवेभ्यो विजिग्ये तस्य ह ब्रम्बणो विजये देवा अहमीतन्त ।।
त ऐक्षन्तास्माकमेवायं विजयो स्माकमेवायं महिमेति ।।१।।

तद्धैषां विजज्ञौ तेभ्यो ह प्रादुर्बभूव तन्न व्यजानत किमिदं यक्षमिति ।।२।।

ते ग्निमब्रुवञ्जातवेद एतद्विजानीहि किमिदं यक्षमिति तथेति ।।३।।

तदभ्यद्रवत् तमभ्यवदत्को सीत्यग्निर्वा अहमस्मीत्यब्रवीज्जातवेदा
वा अहमस्मीति ।।४।।

तस्मिँ् स्त्वयि किं वीर्यमित्यपीदँ् सर्वं दहेयं यदिदं
पृथिव्यामिति ।।५।।

तस्मै तृणं निदधावेत्तद्दहेति । तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न शशाक
दग्धुं स तत एव निववृते नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति ।।६।।

अथ वायुमब्रुवन् वायवेतद्विजानीहि किमतेद्यक्षमिति तथेति ।।७।।

तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्को सीति । वायुर्वा अहमस्मीत्यब्रबीन्मातरिश्वा
वा अहमस्मीति ।।८।।

तस्मिँ् स्त्वयि किं वीर्यमित्यपीदँ् सर्वमाददीयं यदिदं
पृथिव्यामिति ।।९।।

तस्मै तृणं निदधावेत्तदादस्वेति । तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न ।
शशाकादातुं स तत एव निववृते, नैतिदशकं विज्ञातुं ।
यदेतद्यक्षमिति ।।१०।।

अथेन्द्रमब्रुवन्मघवन्नेतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति तथेति
तदभ्यद्रवत्तस्मात्तिरोदधे ।।११।।

स तस्मिन्नेवाकाशे स्त्रियमाजगाम बहुशोभमानामुमाँ हैमवती ताँ्
होवाच किमेतद्यक्षमिति ।।१२।।



## चतुर्थ खंड

सा ब्रह्मेति होवात ब्रह्मणो वा एतद्विजये महीयध्वमिति ततो हैव
विदाञ्चकार ब्रह्मेति ।।१।।

तस्माद्वा एते देवा अतितरामिवान्यान् देवान्यदग्निर्वायुरिन्द्रस्ते
ह्येनन्नेदिष्ठ पस्पृशुस्ते ह्येनत्प्रथमो विदाञ्चकार ब्रह्मेति ।।२।।

तस्माद्वा इन्द्रो तितरामिवान्यान्देवान्स ह्येनन्नेदिष्ठं पस्पर्श स
ह्येनतप्रथमो विदाञ्चकार ब्रह्मेति ।।३।।

तस्यैष आदेशो यदेतद्विद्युतो व्यद्युतदा ३ इतीञ्यमीमिषदा ३
इत्याधिदैवतम् ।।४।।

अथाध्यात्मं यदेतद्‌गच्छतीव च मनो नेन चैतदुपस्मरत्यक्षीक्ष्णँ्
संकल्पः ।।५।।

तद्ध तद्वनं नाम तद्वनमित्युपासितव्यं ।
स य एतदेव वेदाभि हैनँ् सर्वाणि भूतानि संवाञ्छन्ति ।।६।।

उपनिषदं भो ब्रूहीत्युक्ता त उपनिषद् ब्राह्मीं वाव त
उपनिषदमब्रूमेति ।।७।।

तस्यै तपो दमः कर्मेति प्रतिष्ठा वेदाः सर्वाङ्गानि
सत्यमायतनम् ।।८।।

यो वा एतामेवं वेदापहत्य पाप्मानमनन्ते स्वर्गे लोके ज्येथे
प्रतितिष्ठति प्रतितिष्ठति ।।९।।

000

# केनोपनिषद

## प्रथम खंड

**केनोषितं पतति प्रेषितं मनः केन प्राणः प्रथमः पैति युक्तः ।**
**केनेषितां वाचमिमां वदन्ति चक्षुः श्रोत्र क उ देवो युनक्ति ।।१।।**

### अन्वय

केन - कुणाच्या द्वारा
ईषितम् - स्फूर्ती मिळून, परिचालित झाल्याने
प्रेषितम् - प्रेरणा दिल्याने
(हे) मनः - मन
पतति - (आपल्या विषयांकडे) ओढले जाते
केन - कुणाच्या द्वारे
युक्तः - नियुक्त होऊन
प्रथमः - अन्य सर्व इंद्रियापूर्वी
प्राणः - प्राण
प्रैति - धाव घेतो
केन - कुणाच्या द्वारे
ईषिताम् - क्रियाशील झालेली
इमाम् - ही
वाचम् - वाणी
वदन्ति - बोलते
कः - कोण
उ - प्रसिद्ध
देवः - देव
चक्षु - डोळे (आणि)
श्रोतम् - कान
युनक्ति - (यांना) नियुक्त करतो

### अर्थ

हे मन कोणापासून प्रेरणा घेऊन कामनायुक्त होऊन आपल्या विषयामागे



जाते? कोणाकडून चालना घेऊन प्रथम प्राणाचे स्पंदन होते? वाणी कोणाच्या सत्तेने बोलते? कोणता देव डोळ्यांना व कानांना प्रेरणा देतो?

### शिष्यप्रश्न
### (चैतन्याचा शोध)

समजत असल्यापासून मनुष्याच्या मनामध्ये अनेक कूटप्रश्न थैमान घालत असतात. कधीतरी आकाशाकडे पाहिले की वाटते त्याला आधार कोणी दिला? सूर्य आकाशात कशाच्या आधाराने तरंगतो? आकाशातील ग्रह, तारे व आकाशगंगा यांचे सर्व व्यवस्थापन कोण करतो? अशा प्रश्नापासून सुरुवात होऊन मग आपले लक्ष आपल्या शरीरव्यापाराकडे व मनोव्यापाराकडे वळते.

आपले मन अमुक वस्तूवर गेले असे आपण पाहतो, पण कुणी प्रेरणा केली म्हणून हे मन त्या वस्तूवर गेले? क्षणोक्षणी प्राणवायू आपल्या नासिकेत जाऊन आपली जीवन धारणा चालू ठेवतो. कुणी प्रेरणा दिली म्हणून वायू हे काम करतो? आपण आपले विचार वाणीने बोलून दाखवितो. सुख-दुःख वाणीने प्रगट करतो, ती वाचा कुणाच्या प्रेरणेने कार्य करीत असते? या सृष्टीचे आपल्याला ज्ञान होते ते मन व इंद्रिये यांच्याद्वारे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध अशा अनेक विषयांच्या संवेदना इंद्रियामधून व मनामधून आपल्यापर्यंत येतात, पण मन व इंद्रियांना चालविणारा कोण आहे? कारण मन व इंद्रिये ही सारी जड आहेत. त्यांच्यात त्यांचे स्वतःचे चैतन्य नाही, मग कुणाच्या चैतन्यामुळे ती चैतन्ययुक्त होऊन आपआपले विषय जाणण्याला समर्थ बनतात? जड व चेतन यांची विलक्षण गुंतागुंत मानवी जीवनात व्यापून राहिली आहे. आपल्याला पक्के माहिती आहे की, आपल्या देहात मी अमका आहे असे जे स्फुरण क्षणोक्षणी होत असते तो 'मी' हा चेतन आहे, पण ज्याला आपण मी समजतो तो देह, मन व इंद्रिये या साऱ्या गोष्टी जड आहेत. त्यात चैतन्य भासते पण शोधता येत नाही. इंद्रिये, शरीर, मन ही तर निव्वळ साधने आहेत, त्यांना चालविणारा हा दुसराच कोणीतरी आहे. तो चालविणारा कोण या विषयीचा शिष्याचा हा प्रश्न आहे. प्राणशक्तीला जागे करणारा, ज्ञानेंद्रियांना गती देणारा, असा जो आहे तो कोण? असा मर्मग्राही प्रश्न जिज्ञासू शिष्याने आपल्या आचार्यांना विचारला आहे. ज्या प्राणामुळे शरीराचे सर्व व्यवहार चालतात त्या प्राणालासुद्धा प्राणशक्ती देणारा कोण? याचे उत्तर या शिष्याला शोधावयाचे आहे. शिष्याच्या अत्यंत उन्नत अवस्थेमध्ये त्याच्या मनात निर्माण झालेला हा मूलभूत प्रश्न आहे.

०००

# मंत्र दोन
## (ब्रह्मस्वरूप वर्णन)

**श्रोतस्य श्रोतं मनसो मनो यद्वाचो ह वाचं स उ प्राणास्य प्राणः ।**
**चक्षुषश्चक्षुरतिमुच्य धीराः प्रेत्यास्माँल्लोकादमृता भवन्ति ।।२।।**

### अन्वय

यत् - जे
श्रोत्रस्य - कानाचा
श्रोत्रम् - कान
मनसः मनः - मनाचे मन
वाचः वाचम् - वाणीची वाणी
चक्षुषः चक्षुः - डोळ्याचा डोळा
उ - इतकेच काय पण
सः - तो
प्राणास्य प्राणः - प्राणाचा प्राण (सुद्धा आहे)
धीराः - बुद्धिमान लोक
अतिमुच्य - या नामरूपात्मक संसाराच्या पलीकडे जाऊन
अस्मात् लोकात् प्रेत्य - या लोकातून निघून गेल्यावर
ह - खरोखर
अमृता भवन्ति - अमृतस्वरूप होतात

### अर्थ

कानांचा कान आहे, मनाचे मन आहे, वाणीची वाणी आहे व तोच तर प्राणाचा प्राण व डोळ्यांचा डोळा आहे. बुद्धिमान लोक पलीकडे जाऊन अर्थात इंद्रिये-मन इत्यादींना 'मी' समजणे सोडून, या लोकाचा त्याग करून अमृताला प्राप्त होतात.

कानांचाही जो कान आहे, मनाचेही जो मन आहे, वाणीची जो वाणी आहे, नयनांचा जो नयन आहे त्या सर्वांचा आत्माच हा सर्व प्रेरक आहे. कान, डोळे, जीभ, नाक, मन हे सारे या आत्मशक्तीशिवाय व्यर्थ आहेत. ज्ञात व अज्ञात या सार्‍यांच्या पलीकडे ही शक्ती आहे. आत्मा हा त्या शक्तीचाच



अंश असल्यामुळे अंशीपेक्षा वेगळा नाही. ज्ञान देण्याच्या सर्वसामान्य पद्धतींनी ईश्वराचे ज्ञान देता येत नाही. सिमेंट, दगड यांनी बनलेले घर किंवा मंदिर दाखविता येते, त्याचे ज्ञानही करून देता येते, पण ईश्वर दाखवायचा कसा? बाहेरील दगड, माती, विटा जितक्या जड अचेतन आहेत तितकेच हे शरीरही अचेतन आहे.

या देहाला जे दोन कान आहेत त्यांना तिसराही कान आहे, मनाला दुसरे एक मन आहे. वैखरी, मध्यमा, पश्यंती व परा अशा ज्या चार वाणी आहेत, त्यांना पाचव्या वाणीचे सामर्थ्य आहे. प्राण हा सर्व इंद्रियांचा नियामक, प्रेरक व शक्ती देणारा जरी असला तरी त्यालाही नियंता असा प्राण आहे. प्राणालाही प्राणस्वरूप असणारा तो या देहरूपी उपाधीमध्ये गुप्त स्वरूपात आहे. संत, तत्त्वज्ञ अशा महात्म्यांनाच ती गुप्त शक्ती जाणून घेता येते. प्रत्यक्ष अनुमान इत्यादी प्रमाणांनी त्याचे स्वरूपज्ञान होईलच असे नाही. योग्य त्या साधनेच्या बळावरच त्या आत्मरूप चैतन्याचे ज्ञान घेता येते. नेत्र, कर्ण अशा इंद्रियांना स्वतःची अशी ज्ञानशक्ती नाही. केवळ चैतन्यामुळेच या इंद्रियांना विषयांचे ज्ञान होते. देहातील पाच प्राणवायू व वायूतत्त्व आणि मनबुद्धीत येणारे संकल्प-विकल्प हे सर्व काही या आत्मरूप चैतन्यानेच चालते. देहातील प्राणाला प्राणपणा देणारे ते चैतन्य हे आत्मरूपच आहे.

हे ज्याला यथार्थपणे समजते व जो याची अनुभूती घेतो तो देहाचा अभिमान सोडून निर्विषय होऊन कर्मबंधनातून पूर्णपणे सुटतो. असा मनुष्य मृत्यू पावल्यानंतर पुन्हा जन्म-मृत्यूच्या बंधनात सापडत नाही.

०००

## मंत्र तीन व चार

**न तत्र चक्षुर्गच्छति न वागच्छति नो मनो न विद्यो न विजानीमो**
**यथैतदनुशिष्याद् अन्यदेव तद्विदितादथो अविदिताद् अधि ।**
**इति शुश्रिम पूर्वेषां ये नस्तदव्याचचक्षिरे ।।३।।**

### अन्वय

तत्र - तिथे
चक्षु - डोळा
न गच्छति - जात नाही
वाक् - वाणी
न गच्छति - जात नाही
मनः - मन (सुद्धा)
नो (गच्छति) - नाही जात
यथा - ज्याप्रकारे
एतत् - ह्या ब्रह्माबाबत
अनुशिष्यात् - शिष्यास सांगितले जाईल की ते (ब्रह्म) असे आहे
न विद्मः - आम्हाला माहीत नाही
न विजानिमः - दुसऱ्या कोणाला माहीत आहे असे आम्ही ऐकले नाही (कारण)
तत् - ते
विदितात् - ज्ञात वस्तूहून
अन्यत् एव - भिन्नच आहे
अथो - आणि
अनिदितात् - अज्ञात वस्तूहून
अधि - श्रेष्ठ
अस्ति - आहे
अति - असे
पूर्वेषाम् - आधीच्या आचार्यदेवांकडून
शुश्रुम - आम्ही ऐकत आलो आहोत



ये - ज्यांनी
नः - आम्हांस
तत् - ते ब्रह्मतत्त्वा
व्याचचक्षिरे - उत्कृष्टपणे समजाविले होते

### अर्थ

तिथे (त्या चैतन्यघन परमात्म्यात) डोळ्यांना प्रवेश नाही, वाणीला प्रवेश नाही, मनालाही नाही. म्हणून त्याच्याबद्दल (तो असा आहे या प्रकारे) ज्ञान कसे द्यायचे ते आम्हाला स्वतःला ठाऊक नाही (न विद्मः) आणि दुसऱ्या कोणाला ठाऊक असल्याचेही ऐकिवात नाही. (न विजानीमः) कारण ते (आत्मतत्त्व) ज्ञात वस्तूहून अन्य व अज्ञात वस्तूहून श्रेष्ठ आहे. हे आम्ही आम्हाला शिकविणाऱ्या पूर्वीच्या आचार्यांकडून ऐकले होते.

**यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते ।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।४।।**

### अन्वय

यत् - ते
वाचा - बोलून
अन्-अभि-उदितम् - सांगितले जात नाही
अपि तु - परंतु
येन - ज्याने
वाक - वाणी/बोलणे
अभ्युद्यते - व्यक्त होते
तत् एव् - त्यालाच
त्वम् - तू
ब्रह्म - ब्रह्म
विद्धि - जाण
इदम् यत् - ह्या ज्याची
उपासते - लोक उपासना करतात
इदम् - हे
न - ते ब्रह्म नव्हे

## अर्थ : ४

जे वाणीद्वारे व्यक्त होत नाही पण वाणी ज्याच्यामुळे व्यक्त होत आहे, तेच ब्रह्म आहे असे तू जाण; ज्याची लोक उपासना करतात ते हे (म्हणजे उपास्य गोष्टी) (ब्रह्म) नव्हे.

## आपला आंतरात्माच ईश्वर होय

ज्या मनाने संकल्प करून ईश्वर जाणावयाचा असतो त्या मनाचे चैतन्यच ईश्वर आहे. मनाची जाणण्याची शक्तीच मुळी ईश्वर असल्याने मन ईश्वर जाणू शकत नाही.

ईश्वराची अमुक एक सगुण मूर्ती कुणी डोळ्यापुढे आणली तर तो ईश्वर नव्हे. कारण डोळेच ईश्वराच्या योगाने पाहतात. त्यामुळे ते ईश्वराला पाहू शकत नाहीत. कानांचीही ती कहाणी. कान ज्यामुळे ऐकू शकतात ते चैतन्यच मुळी ईश्वर आहे. त्यामुळे कान ईश्वराला जाणू शकत नाहीत. एखाद्या इंद्रियाच्या अथवा मनाच्या शक्तीने ईश्वराचे दर्शन झाले असे वाटत असते तेव्हा ते ईश्वराच्या एकाच अंशाचे ज्ञान असते. ते ईश्वराचे सम्यकज्ञान किंवा संपूर्ण दर्शन नसते. इंद्रियांनी जेव्हा आपण ईश्वर पाहिला असे मानतो तेव्हा आपण आंधळ्याची हत्ती ओळखावा तसा ईश्वर ओळखतो. सर्व इंद्रिये जड असल्याने खरे म्हणजे त्यांना तो समजत नाही. इंद्रियांना जे ज्ञान होते ते स्वतःच्या शक्तीने होत नसून आत्म्याच्या सत्तेनेच होते, म्हणूनच तो अज्ञेय व अनिर्वचनीय आहे. म्हणून वेदांनीसुद्धा त्याचे वर्णन 'नेति, नेति' असे केले आहे. असा आत्मा इंद्रियांना कळत नसल्याने तो तुला कसा सांगावा हे मला समजत नाही, असे आचार्य शिष्याला म्हणतात. ज्या वस्तूचे ज्ञान व्हावयाचे असते त्या वस्तूला काही गुण असावे लागतात व असे गुण असणारी वस्तू कोणत्यातरी प्रमाणाने व अनुमानाने कळावी लागते, पण इथे ईश्वर हे तत्त्व निर्गुण, निर्विषय असल्याने त्याला कसे जाणता येणार? ते ब्रह्म स्वयंप्रकाशी, ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान असे एकमेव असल्यामुळे ते कोणत्याही साधनाने कळत नाही. हे सर्व असे असल्यामुळे, मन व बुद्धी ही त्रिगुणात्मक असल्याने आत्म्याविषयी अनेक प्रकारच्या कल्पना निर्माण करते व शेवटी आपणच आत्मा आहोत असे ते ठरवितात म्हणून तू 'आत्मा जाणून घे' अशी जी उपदेश परंपरा आहे ती ईश्वरदर्शनाच्या दृष्टीने पूर्णपणे विपरीत आहे असे तू समज. सर्व व्यापी असे विशाल आत्मचक्षु उघडले असतानाच तो दिसण्याचा संभव असतो. वस्तुतः आपण जेव्हा इंद्रिये जागी आहेत असे मानतो तेव्हा ईश्वरदर्शनाच्या दृष्टीने ती इंद्रिये निद्रित असतात. जेव्हा लौकिक अर्थाने इंद्रिये निजतात तेव्हाच आत्मचक्षुला



जागृती येते आणि ईश्वर दिसण्याचा संभव प्राप्त होतो. त्या वेळीच ईश्वर सर्वसाक्षी आहे हे दिसते.

आत्म्याचे ज्ञान शिष्याला देण्याची अन्य कोणतीही पद्धत आम्हाला ठाऊक नाही व कुणाला ठाऊक आहे असेही ऐकिवात नाही. वास्तविक आत्म्याची प्राप्ती याचा अर्थ ह्याच्याविषयीचे अज्ञान नष्ट होणे इतकाच. सर्व श्रुति - स्मृती - पुराणांचा असा निःसंदिग्ध उद्घोष आहे की पृथ्वीवर जे जे आहे ते सर्व ईश्वराचे स्वरूप आहे. सर्व चराचर वस्तूमध्ये तोच आहे. एकमेवाद्वितीय परमात्माच सर्वत्र भरून राहिला आहे. पण केवळ भ्रमामुळे अनेक रूपांनी तो आपल्याला जाणवतो.

शेवटी गुरू शिष्याला उपदेश करतात की, आत्मा जाणण्याची इच्छा मात्र तू सोडून देऊ नकोस. आत्म्याला अनुभवण्याचा मार्ग गुरू-शिष्य परंपरेतून येत असतो. एका ज्योतीने दुसरी ज्योत पेटविता येते. तसेच हे आत्मज्ञानही गुरूकडून शिष्याकडे संक्रमित होत असते. केवळ आपल्या बुद्धीवर विसंबून राहून व चाकोरीबद्ध साधना करून हे प्राप्त करता येत नाही, तर ब्रह्मज्ञानी गुरू-शिष्यांच्या परंपरेशी स्वतःला जोडल्यानेच हे ज्ञान प्राप्त करता येते. 'इदम् खलू सर्वम् ब्रह्मम् तत्त्वम् अशी, अहं ब्रह्मास्मी' अशी जी महावाक्ये श्रुतिंनी सांगितली आहेत ती ऋषींनी आपल्या अनुभूतीद्वारे सांगितलेली संपूर्ण सत्य परंपरा आहेत. अशा ब्रह्मज्ञानी गुरू-शिष्यांच्या परंपरेत तू स्वतःला जोडून घेऊन आत्मज्ञानी होण्याचा प्रयत्न कर, असे गुरू शिष्याला उपदेश करतात.

000

# मंत्र पाच ते आठ

**यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम् ।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।५।।**

### अन्वय

| | |
|---|---|
| यत् - जे, ज्याला (कोणीही) | मनसा - मनाने |
| न मनुते - समजू शकत नाही | अपि तू - पण |
| येन - ज्याच्यामुळे | मनः - मन |
| मतम् - ज्ञात होते | आहुः - असे म्हटले जाते. |

### अर्थ

जे मनाद्वारे मनन केले जात नाही पण ज्याच्यामुळे मनाला 'मनन करणारे' म्हटले जाते तेच ब्रह्म होय असे तू जाण; ज्याची लोक उपासना करतात ते हे म्हणजे (ब्रह्म) नव्हे.

**यत्वक्षुषा न पश्चति येन चक्षूँषि पश्चति ।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।६।।**

### अन्वय

| | |
|---|---|
| यत् - जे ज्याला (कोणीही) | चक्षुषा - डोळयाने |
| न पश्चति - पाहू शकत नाही | अपि तू - पण |
| येन - ज्याच्या अस्तित्वामुळे | चक्षुंषि - डोळा (आपल्या विषयांना) |
| पश्चति - पाहतो | |

### अर्थ

जे डोळयांनी पाहता येत नाही पण ज्याच्यामुळे डोळे पाहण्यास समर्थ होतात तेच ब्रह्म होय असे तू जाण; ज्याची लोक उपासना करतात ते हे म्हणजे (ब्रह्म) नव्हे.

**यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदँश्रुतम् ।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।७।।**



### अन्वय

| | |
|---|---|
| यत् - जे (कोणीही) | श्रोत्रेण - कानाने |
| न शृणोति - ऐकू शकत नाही | अपि तु - पण |
| येन - ज्याच्या अस्तित्वामुळे | इदम् श्रोत्रम् - हे कान |
| श्रुतम् - ऐकू शकतात (ऐकतात | |

### अर्थ

जे कानाद्वारे ऐकता येत नाही पण ज्याच्यामुळे 'हे कान' असे लोक जाणतात (अर्थात कर्णेंद्रिये ज्याच्यामुळे अस्तित्वात येतात) तेच ब्रह्म होय असे तू जाण; ज्याची लोक उपासना करतात ते नव्हे.

**यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्रणीयते ।**
**तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।८।।**

### अन्वय

| | |
|---|---|
| यत् - जे (ज्याला) | प्राणेन् - प्राणाद्वारे |
| न प्राणिति - हुंगता येत नाही वा जिवंत करता येत नाही | |
| येन - ज्याच्याने | प्राणः - प्राण |
| प्रणीयते - हुंगण्याचे वा जिवंत ठेवण्याचे आपले कार्य करतात. | |

### अर्थ

जे प्राणाचा (नासिकास्थित घ्राणेन्द्रियाचा) विषय होऊ शकत नाही, पण ज्याच्यामुळे प्राणाला अस्तित्व येते तेच ब्रह्म होय असे तू जाण. ज्याची लोक उपासना करतात ते हे नव्हे.

## आपला आंतरात्मा हाच ईश्वराचा अंश

केनोपनिषदाच्या तृतीय मंत्रात, आत्मा हा सर्व इंद्रियांच्या व मनाच्या पलीकडे आहे व म्हणून त्याचे साधारण अर्थाने ज्ञान देणे अशक्य आहे असे म्हटले होते. याच्या अनुभूतीसाठी वेगळ्या प्रकारचा प्रयत्न, साधना केल्याशिवाय हा प्राप्त होत नाही. तो आत्मा हा ज्ञात नसला तरी तो अज्ञातही नाही, तो अज्ञातापेक्षा श्रेष्ठ आहे असे ऋषींनी सांगितले होते.

आता ४ ते ८ या मंत्रांतून ऋषी शिष्याच्या अंतःकरणावर तीन गोष्टी ठसविण्याचा प्रयत्न करीत आहेत –

१) आत्मा ज्ञात नाही पण सर्व बुद्धी - इंद्रियजन्य ज्ञानप्रक्रियेचा मूलभूत एकमेव असा आधार आहे.

२) हा निरनिराळ्या लहान-मोठ्या शरीरात राहिलेला आत्मा वस्तुतः तो सर्वव्यापी, विश्वाधार असा परब्रह्म स्वरूप आहे.

३) त्याला सोडून दुसरे काहीच ब्रह्म नव्हे ज्याची ज्याची म्हणून उपास्य - उपासक अशा द्वैत बोधाने जगात उपासना केली जाते ते सर्व त्यातील खंडितपणामुळे ब्रह्म राहत नाही.

वाणीद्वारे ब्रह्माचे वर्णन करता येत नाही. वाणी सर्व प्रकारे वस्तूच्या गुणावगुणावरून वर्णन करू शकते, पण जे निर्गुण, निराकार असे चैतन्यस्वरूप आहे त्याला वाणी व्यक्त करू शकत नाही. तसेच मनाचे व इतर इंद्रियांचे. मन हे सतत इंद्रियांच्या त्या त्या विषयांच्या अधीन झालेले असल्याने काम, भय अशा अनेक विकारांनी युक्त असल्यामुळे ते शुद्ध स्वरूप आत्म्याला जाणायला असमर्थ असते. हे मन जेव्हा जडरूप पदार्थांना जाणते तेव्हा त्याच्यामागे तो आत्मरूप प्रकाशच असतो. ते चैतन्य आत्मरूप असून त्या चेतनेमुळेच मनाला मनपण असल्याने ते मन आत्म्याला कधीही जाणू शकत नाही. वाणी व मन यासारखेच इतर इंद्रियांचे आहे. कान हे इंद्रिय आकाशतत्त्वापासून निर्माण झाले असून दिशा ही त्याची देवता आहे. कर्ण हे इतर सर्व नादांना जाणते पण त्या आत्मतत्त्वाचा बोध त्याला होत नाही. नाकातून प्राणरूपाने जी वृत्ती बाहेर पडते ती सर्व गंधांना जाणते, परंतु ती प्राणमय असूनही आत्म्यावाचून निरुपयोगी असते. ह्या सर्व इंद्रियांना आपआपले अस्तित्व व सामर्थ्य मिळते ते या आत्म्यामुळेच.

असा हा आत्मा सर्वभूताधि वासः म्हणजे सर्व प्राणिमात्रांच्या आत दडलेला आहे. तो स्वरूपतः ब्रह्म आहे. उपनिषद म्हणते, 'तदेव ब्रह्म' - तेच ब्रह्म होय. म्हणून येथे गुरू शिष्याला सांगत आहेत की, आपली आत्मसत्ता म्हणून जो आत्मा जाणवतो तो वस्तुतः या समस्त विश्वब्रह्मांडाची स्वरूपभूत सत्ता जे ब्रह्म ते आहे हे ज्ञान प्राप्त करून घे. देहात्मकेच्या भावनेने मी म्हणजे हा देह, मी म्हणजे हे मन व इंद्रिये असा जो अनुभव आपल्याला येत असतो त्याच्याऐवजी 'मी ब्रह्म' असा अनुभव येणे म्हणजेच ज्ञान होणे होय. उपाधींचा भ्रम काढून टाकताच याची अनुभूती येते. मी आणि माझे सोडून व निर्विषय होऊन विवेकाची जे कास धरतात त्यांना याची अनुभूती मिळणे सोपे होते. शुद्ध चित्तातच विवेक उद्भवत असतो. विवेकातूनच विराग जन्मत असतो आणि



असल्या वैराग्यानेच साधक अनित्याकडे, असत्याकडे पाठ फिरवून, मोहनिरास होऊन त्या एकमेव सत्याकडे, आनंदस्वरूप चैतन्याकडे वळू शकतो. त्या आत्मस्वरूपाचे ज्ञान होणे यातच जीवनाची कृतार्थता आहे.

आत्मा हाच ब्रह्म होय, स्वतःहून भिन्न अशा ज्या कशाची मनुष्य पूजा वा उपासना करीत असतो ते ब्रह्म नव्हे असे ऋषी या पाचही मंत्रांत ठासून सांगतात. या सर्व मंत्रांत थोडी पुनरावृत्ती झालेली असली तरी ऋषी या आंतरिक साधनेवर अत्यंत ठाम आहेत. आत्मा हा आपल्यातच आहे. सर्व उपाधींचा त्याग करून त्याचे दर्शन घेणे म्हणजेच आत्मदर्शन. अशा त्या आत्म्याला बाहेरच्या जगात शोधणे हे व्यर्थ आहे. म्हणून साधनेद्वारा बाहेरच्या ज्या रूपाची उपासना केली जाते ते ब्रह्म नव्हे. आरशात पाहून एखादी चिमणी जशी आरशातल्या चिमणीला दुसरी चिमणी समजून चोच मारत असते, तेव्हा त्या चिमणीला कशाचीच अनुभूती येत नाही. प्रतिबिंब हे आभासमय असते. त्याचा जसा अनुभव येत नाही तसेच आपणही या देशकालनिमित्त रूप आरशात स्वतःचेच प्रतिबिंब जगरूपाने पाहत असतो. त्या जगाच्या ईश्वराला उपासनेद्वारे धरू पाहत असतो, पण तो परमात्मा, सदासर्वदा आपल्यातच दडलेला आहे, म्हणून ऋषी म्हणतात की, त्या आंतरात्म्याचीच साधना केली पाहिजे. हे दर्शन घेण्याची शक्यता केवळ मनुष्य जन्मामध्ये आहे. जो मनुष्य जन्माला येऊन हे जाणून घेतो तोच धन्य होय. त्यांचेच जीवन सार्थ होते व तेच या जन्ममरणातून सुटतात.

०००

# द्वितीय खंड

## मंत्र पहिला

**यदि मन्यसे सुवेदेति दभ्रमेवापि**
**नूनं त्वं वेत्थ ब्रह्मणो रूपम् ।**
**यदस्य त्वं यदस्य दैवष्वथ नु**
**भीमा स्यमेव ते मन्ये विदितम् ।।१।।**

### अन्वय

यदि - जर
त्वम् - तू
इति - असे
मन्यसे - समजत असशील (की)
सुवेद - मी ब्रह्मतत्त्व चांगल्या रीतीने जाणले आहे
अपि - तर
नूनम् - खरोखर
ब्रह्मणः - ब्रह्माचे
दहरम् एव - थोडेच
रूपम् - स्वरूप
वेत्थ - जाणतोस (कारण)
अस्य - ह्याचे (ब्रह्माचे)
यत् जे - स्वरूप
त्वम् - तू आहेस (आणि)
अस्य - ह्यांचे
यत् - जे (स्वरूप)
देवेषु - देवतांमध्ये (आहे)
तत् अल्पम एव - ते सगळे मिळूनसुद्धा अत्यंत थोडच आहे
अथ नु - (म्हणून) ते (तुझे ज्ञान) (ब्रह्माविषयीचे)
मीमांस्यम् एव - निश्चितच विचारणीय आहे. (त्यावर विचार करून शिष्य म्हणाला



मन्ये - मी असे मानतो की
विदितम् - जाणले

### अर्थ

### शिष्यप्रेरणा

जर तू समजत असशील की, 'मी चांगल्या प्रकारे जाणतो' तर तू थोडेसेच ब्रह्माचे रूप जाणतोस. तसेच ब्रह्माचे जे रूप देवता जाणतात तेही थोडेसेच आहे. म्हणून अजून ब्रह्म तुझ्यासाठी विचारणीय आहे. (मग विचार करून शिष्य म्हणाला) 'जाणले असे वाटते'.

खरा गुरु शिष्याला अर्धवट ज्ञान कधीही देत नाही. म्हणून मागील मंत्रात शिष्याला उपदेश देताना त्यांनी सांगितले की, आत्मा हा शरीरात व्यापून राहिलेला आहे पण त्याचबरोबर तो त्यांच्या पलीकडेही आहे. मन - इंद्रियातून तोच खंडित होऊन प्रत्ययाला येत असतो. म्हणून मन - इंद्रिये त्याला जाणू शकत नाहीत. सर्व काही या चैतन्य घन आत्म्याचेच प्रकटीकरण आहे. तोच ब्रह्म होय. ब्रह्म किंवा ईश्वर हे काही आकाशापलीकडे कुठेतरी लपलेले व द्वैत भावाने उपासना करून प्राप्त करायचे तत्त्व नव्हे, तर आत्माच ब्रह्म होय.

असा उपदेश सत्शिष्याने ऐकल्यानंतर तो ठरवतो व त्या परमात्म्याच्या अनुभूतीसाठी साधना करू लागतो. केवळ ब्रह्माविषयीचे शब्दज्ञान वेगळे व आत्मज्ञानासाठी गुरूच्या मार्गदर्शनानुसार केलेली साधना वेगळी. या उपनिषदाच्या प्रथम खंडात गुरूंनी केलेल्या मार्गदर्शनानुसार असा शिष्य साधना करतो व त्याचा परिणाम म्हणून आत्म्याच्या स्वरूपाचा थोडासा स्पर्श त्याला जाणवू लागतो. अशा अल्पशा अनुभूतीनेसुद्धा तो आनंदाच्या डोही आनंद तरंग अशा अवस्थेत राहू लागतो. वास्तविक साधना पूर्णपणे फलद्रूप झालेली नसते. अजूनही बराच पल्ला गाठायचा असतो, मग अशा वेळी त्याला लाभलेले सिद्धहस्त गुरू त्याला पुन्हा अधिक उन्नतीची जाणीव करून देतात व त्याने किती अल्पशी प्रगती केली आहे याची जाणीव करून देतात. अल्पसंतुष्ट न होता पूर्णत्वाकडे जाण्यासाठी सावधानतेचा इशारा देतात. आपण ब्रह्माला चांगल्या रीतीने जाणले आहे असा आत्मसंतुष्टीचा भाव शिष्याने न आणता त्याने उचित साधना करावी म्हणून योग्य ते मार्गदर्शन करतात. आत्म्याचा किंचित प्रकाश लाभला पण या थोड्याशा प्रकाशालाच संपूर्ण ब्रह्मदर्शन समजण्याची चूक करणाऱ्या साधकाला हा उपदेश लागू आहे. हा उपदेश जर शिष्याने कृतीत आणला नाही तर त्याची प्रगती खुंटते.

आध्यात्मिक साधनेत अल्पशा यशाने हुरळून न जाता अंतिम ध्येय प्राप्त होईपर्यंत अविरत साधना सुरू ठेवली पाहिजे. शिष्याला जर असे वाटले की, आपल्या बुद्धीने हे करण्यात आपण कमी पडतो तर त्याने आपला, असा न्यूनगंड काढून टाकावा, कारण उपनिषद हेही सांगते की, देवतांनासुद्धा या परब्रह्माचे संपूर्ण स्वरूप समजलेले नसते. म्हणून या उपनिषदाचे ऋषी शिष्याची ही शंकाही काढून टाकतात. प्रश्न बुद्धीच्या कमी-अधिकपणाचा नाही तर चित्तशुद्धी पुन्हा अधिक उत्साहाने साधना करू लागतात. मनुष्य देहात्मक ब्रह्माला 'आध्यात्मिक' असे नाव असून देवता लोकात्मक ब्रह्माला 'अधिदैव' म्हणतात. ती दोन्ही ब्रह्मस्वरूपाच्या एकाच अंशावर भासतात म्हणून 'मला ब्रह्मज्ञान झाले' असे ज्याला वाटले त्याला ते साधारणच समजले व तोकडे समजले असे सदगुरू म्हणतात. सदगुरूंचा हा अभिप्राय लक्षात घेऊन शिष्य चित्तवृत्तींचा निरोध करून ब्रह्मस्वरूपाचे चिंतन करू लागला. अशा साधनेने समृद्ध अनुभव मिळविलेला शिष्य आचार्यांजवळ येऊन म्हणू लागला की, मला समजले असे वाटते. आता जे समजले ते काय हे पुढील मंत्र सांगेल.

000



# मंत्र दुसरा

**नाहं मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च ।**
**यो नस्तद्वेद तद्वेद नो न वेदेति वेद च ।।२।।**

## अन्वय

अहम् सुवेद इति न मन्ये - मी चांगल्या प्रकारे जाणतो असे समजत नाही
न वेद इति नो - (आणि) आणि जाणत नाही असेही नाही
वेद च - ते जाणतोच
नः यः तत् वेद - आम्हा शिष्यांपैकी जो ते जाणतो
तत् वेद नो न वेद इति - की तो जाणतो आणि जाणत नाहीही
वेद च - तोच जाणतो

## अर्थ

### परमतत्त्व जाणल्याची चिन्हे

मी ब्रह्म चांगल्या रीतीने जाणले असे मानत नाही, जाणत नाही असेही मानत नाही. म्हणूनच मी ते जाणतो. आम्हा शिष्यांपैकी जो अशा प्रकारे त्याला जाणतो तोच खरोखर जाणतो.

त्या परमतत्त्वाची ओढ लागलेल्या श्रद्धावान शिष्याने गुरूच्या सांगण्याप्रमाणे साधना केली व परिणामस्वरूप त्याला काही अनुभव आले. मी म्हणजे ब्रह्म अशी एकत्वाची जाणीव त्याला थोडीबहुत आली, त्यामुळे तो म्हणतो की, मला ब्रह्मज्ञान झाले व झालेही नाही. हे गुरुदेवा, अशा रीतीने मी ब्रह्म जाणले आहे. शिष्याच्या या समजण्याच्या वेळी तो मोहनिरास व निर्विषय झालेला होता, परंतु पुन्हा जेव्हा तो जाणिवेच्या स्तरावर आला, जेव्हा वृत्ती सजग झाल्या त्या वेळी त्याला आपल्या वचनाचे स्मरण होऊन आलेली अनुभूती 'कळली' अशा स्वरूपात आल्यासारखे वाटले. म्हणून ती क्रिया जड अशा बुद्धीची असल्याने जडाला चैतन्याचा अनुभव कसा येईल?

ब्रह्मज्ञानाच्या जवळच्या स्थितीलाच ब्रह्मज्ञान समजू नये, असा इशारा गुरूने आधीच दिला होता. त्यानुसारच शिष्याने मीपणाच्या पलीकडे जाऊन श्रवणं, मननं, निधिध्यासन - स्वरूपसाधना करून निर्मोह अवस्थेत गुरूला सांगितले, 'समजले असे वाटते'. गुरूने जेव्हा खुलासा विचारला तेव्हा आपला

अनुभव शब्दबद्ध करण्याचा हा शिष्य प्रयत्न करीत आहे. वास्तविक ब्रह्मैक्याची ही अवस्था शब्दांनी वर्णन करण्याच्या पलीकडची आहे. कारण वाणी तिथपर्यंत पोहोचू शकत नाही. 'यतो वाचो निर्वतंते अप्राप्य मनसा सः' - 'जिथे पोहोचणे शक्य न झाल्याने मनासह वाणी परत फिरते' असा हा शब्दापलीकडच्या अवस्थेचा अनुभव जेव्हा शब्दांत मांडण्याचा खटाटोप हा शिष्य करत आहे त्या वेळी ते निश्चितच विपरीत असणार यात संशय नाही.

हे समजूनच पुन्हा शिष्य सांगतो की, मी ते परब्रह्म चांगल्या रीतीने जाणतो असे समजत नाही, कारण ते ज्ञाता-ज्ञान-देय अशा त्रिकुटीचा विषय होऊ शकत नाही हे मला कळले आहे. मी आणि जग यात परब्रह्म ओतप्रोत भरलेले आहे. जाणणारा त्याच्यापासून वेगळा नाही म्हणून 'मी परब्रह्म नीट जाणतो' हे वाक्य पूर्णसत्य असू शकत नाही.

शिष्याची अवस्था उत्तरोत्तर अधिकाधिक उन्नतीची झाली आहे. त्याच्या मनात आता कसलाच गोंधळ नाही. सामान्य अर्थाने जाणणे व न जाणणे या दोन्हीचा परब्रह्माला स्पर्श होत नाही हे त्याला समजले आहे. पृथ्वीवर दिवस आणि रात्र असतात. दिवस नसतो तेव्हा रात्र असते, रात्र नसते तेव्हा दिवस असतो. पण सूर्यावर दिवस व रात्र यांना काहीही अर्थ उरत नाही. सूर्यावर सतत अनंत दिवसांचा एकत्रित उजेड आहे. त्याचप्रमाणे परब्रह्माचा किंचित प्रकाशच सर्व सापेक्ष लौकिक ज्ञानातून परावर्तित होत असतो व तो परावर्तित प्रकाश न मिळणे यालाच सापेक्ष अज्ञान म्हटले जाते. पण परब्रह्म याप्रकारे 'ज्ञात नाही' व 'अज्ञातही नाही' याचे ज्ञान झालेला शिष्य निःसंदिग्धपणे गुरूला सांगतो की, 'मी परब्रह्म चांगल्या प्रकारे जाणतो असे मानत नाही, जाणत नाही असेही म्हणत नाही आणि म्हणूनच मी ते जाणतो.'

शिष्याचे हे बोलणे विसंगत वाटत असले तरी गुरूला त्यांनीच सांगितलेल्या सत्यानुसार निश्चयपूर्वक साधना केल्याने व तसा अपरोक्ष अनुभव घेतल्याने तो निःसंदिग्धपणे हे सांगत आहे. या अनुभवाच्या बळावरच तो पुन्हा सांगतो की, आम्हा व्रतस्थ शिष्यांपैकी ज्यांना या पद्धतीने ज्ञान झाले आहे त्यांनाच ब्रह्मज्ञान झाले असे म्हणता येते. केवळ गुरूच्या प्रश्नाला उत्तर देण्यासाठी ते जाणलेले ज्ञान आपल्याला अशा पद्धतीने सांगावे लागले, असे शिष्य म्हणतो. ह्या ब्रह्मज्ञानाहून वेगळ्या पद्धतीने जे जे ब्रह्म जाणले जाते ते सर्व कार्यब्रह्म असून ते उपासनेसाठी योग्य आहे. आता या पुढे गुरू-शिष्य संवादाची ही रीत सोडून उपनिषद आपली शिकवण सांगत आहे.

०००



# मंत्र तिसरा

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ।**
**अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम् ।।३।।**

## अन्वय

यस्य अमतम् - ज्याचे असे मत आहे की ब्रह्म जाणता येत नाही
तस्य - त्याचे
मतम् - जाणणे झाले आहे (आणि)
यस्य - ज्याचे
मतम् - असे मानणे आहे की मी ब्रह्म जाणले
सः - तो
न वेद - जाणत नाही (कारण)
विजानताम् - ज्ञानाहंकार असणाऱ्यांसाठी
अविज्ञातम् - ते ब्रह्म अज्ञेय आहे (आणि)
अविजानताम् - ज्ञानाहंकार नसणाऱ्यांसाठी
विज्ञातम् - ते परब्रह्म ज्ञात आहे

## अर्थ

### ब्रह्मज्ञानाचा अधिकारी

जो म्हणतो की, मी जाणत नाही तो जाणतो, जो 'मी जाणतो' असे समजतो तो जाणत नाही. ते परब्रह्म ज्ञानी महापुरुषांच्या मते 'अविज्ञात' - न जाणले जाणारे आहे, तर अज्ञानी लोकांच्या मते ज्ञात आहे.

मागील मंत्रात समर्थ सद्गुरूंच्या उपदेशानुसार योग्य पद्धतीने साधना करणाऱ्या शिष्याचा क्रमविकास कसा होत जातो व त्याला ब्रह्मज्ञानाची अपरोक्ष अनुभूती कशी प्राप्त होते ते गुरू-शिष्यांच्या संवादातून उपनिषदाने मांडले आहे. जिज्ञासू शिष्य तळमळीने साधना करू लागल्यानंतर ते सिद्धावस्था प्राप्त होईपर्यंतचा आलेख आपण पाहिला. आता या मंत्रात उपनिषदकार स्वतःचा अभिप्राय म्हणून हाच सिद्धांत मांडत आहेत. इंद्रियांच्या साहाय्याने आत्मा वा परमात्मा जाणता येत नाही असा ज्याचा निश्चय झाला आहे तो आत्मज्ञानी झालाच असे समजावे आणि जो इंद्रियांच्या साहाय्याने तो जाणला असे म्हणतो त्याची मात्र तो न जाणता फसवणूकच झालेली असते. मन,

बुद्धी अशा इंद्रियांनीच ब्रह्म जाणावयास निघालेला अज्ञानाच्या अंधकारात अडकतो. परब्रह्म ज्ञाता - ज्ञेय या भेदापलीकडे असल्याने ते लौकिक अर्थाने जाणता येत नाही. म्हणूनच सर्वांना व्यापून असणाऱ्या परब्रह्माचा अपरोक्ष अनुभव ज्या वासनारहित शुद्ध चित्तात येतो त्याला म्हणायचे ब्रह्मज्ञानी. म्हणूनच उपनिषद म्हणते की 'यस्य अमतम्' - ज्याला ब्रह्म अमतम् म्हणजे जाणण्यापलीकडे आहे असे कळले तो खऱ्या अर्थाने जाणतो. या उलट ज्याला परब्रह्म ज्ञात आहे असे वाटते तो जाणत नाही.

समर्थ सद्‌गुरू या वेळी समजावून सांगतात की, ते परब्रह्म इंद्रियांच्या साहाय्याने किंवा जाणीव वा नेणिवेच्या माध्यमातून आकलन होणारे नाही. अपरोक्ष अनुभूती घेऊन, ब्रह्मस्वरूप होऊन ज्यांनी ते जाणले त्यांनाच ते कळले, हे या मंत्रात उपनिषदाला सांगावयाचे आहे.

प्रत्येक जण स्वतःला जाणणारा (ज्ञाता) समजतो व जगाला जाणले जाणारे (ज्ञेय) समजतो. मी आणि जग यातील भेद हाच अज्ञानी लोकांच्या समग्र जीवनाचा पाया असतो, या भ्रामक भेदावरच सारे जाणणे आधारलेले असते. अशा लोकांना परब्रह्म त्यांच्या स्वतःहून भिन्न भासत असल्याने त्यांना ते पुरेपूर समजत नाही. पण ज्याला परब्रह्माचा अपरोक्ष अनुभव आलेला असतो, त्याच्यासाठी परब्रह्म स्वतःहून भिन्न नसल्याने ज्ञेय असू शकत नाही. पण इंद्रिये, मन, बुद्धी यांनाच 'मी' समजणाऱ्यांना ब्रह्म व उपाधी या दोन्हीतला फरक समजत नाही. म्हणूनच उपनिषद म्हणते की, ते परब्रह्म ज्ञानी लोकांसाठी अज्ञात व अज्ञानी लोकांसाठी ज्ञात आहे.

हे संपूर्ण विश्वच ब्रह्म आहे. इंद्रियजन्य ज्ञान वस्तूहून हीणकसच असते, कारण ज्ञान म्हणजे वस्तूला मर्यादित करणे नव्हे. एखाद्या वस्तूचे आपल्याला जेव्हा ज्ञान होते तेव्हा ती वस्तू आत घेऊन तिला आम्ही आपल्या जाणिवेच्या पातळीवर आणतो, त्यामुळे त्या वस्तूचे संपूर्ण ज्ञान आम्हाला होत नाही. सगळ्या वस्तूंच्या ज्ञानाच्या बाबतीत हे सत्य आहे. मग अनंत परब्रह्माच्या बाबतीत तरी वेगळे काय असणार? जो सर्व ज्ञानाचे मूळ उपादान आहे, जो सर्वसाक्षी आहे, जो निर्गुण केवल आहे व जो सर्व विश्वाचा व आपल्या आत्म्याचा साक्षी आहे त्याला आम्ही कसे मर्यादित करू शकणार? अशा परब्रह्माला विश्व होऊन विश्वाला जाणण्याच्या पद्धतीनेच जाणावयाला पाहिजे. खरा ब्रह्मज्ञानी हा जाणीव वा नेणिवेच्या पलीकडे जाऊन निरपेक्ष परमसत्याचा अपरोक्ष अनुभव घेत असतो.

०००



## मंत्र चौथा व पाचवा

**प्रतिबोधविदितं मतममृतत्वं हि विन्दते ।**
**आत्मना विन्दते वीर्यं विद्यया विन्दते मृतम् ।।४।।**

### अन्वय

प्रतिबोथविदितम् - उपर्युक्त प्रतिबोधाने झालेले ज्ञान
मतम् - खरोखरचे ज्ञान होय
हि - किरण ह्याने
अमृतत्वम् - अमृतस्वरूपता
विन्दते - लाभते
आत्मना - आत्म्याने
वीर्यम् - परमात्म्यास प्राप्त करण्याची शक्ती
विन्दते - प्राप्त होते (अन्)
विद्यया - विद्येने
अमृजम् विन्दते - अमरत्व प्राप्त होते

### अर्थ

**मनुष्य जन्माचे सार्थक**

प्रत्येक बोधाद्वारे, प्रत्येक जाणिवेच्या स्पंदनाद्वारे त्याचेच (परमात्म्याचेच) ज्ञान होत असते. प्रत्येक जाणिवेच्या स्पंदनात तोच भारलेला आहे हे जाणून अमृततत्वाची प्राप्ती होते. आत्म्याच्या स्वरूपाचे ज्ञान झाल्याने - आत्मविद्येने - अमृततत्त्व - प्राप्तीसाठी सामर्थ्य मिळते.

**इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः ।**
**भूतेषु भूतेषु विचित्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ।।५।।**

### अन्वय

चेत् - जर
इह - येथे ह्या लोकी ह्या देही
अवेदीत् - परब्रह्मास जाणले

अथ - तर
सत्यम् अस्ति - ठीक आहे, कृतार्थता आहे
चेत् - जर
इह - येथे
न अवेदीत् - परब्रह्मास जाणले नाही
महती - प्रचंड
विनष्टिः - नुकसान
धीराः - धीर पुरुष
भुतेषु भूतेषु - चराचरात
विचित्य - त्या परब्रह्मास जाणून
अस्मात् लोकात् - ह्या दुनियेतून
प्रेत्य - प्रयाण करून
अमृता - अमृत
अवन्ति - होतात

**अर्थ**

जर ह्या जन्मीच हे आत्मज्ञान प्राप्त केले तर जन्माचे सार्थक झाले; जर ह्या जन्मी आत्मज्ञान मिळवले नाही तर फार मोठे नुकसान झाले. बुद्धिमान लोक प्रत्येक भूतमात्रात त्यालाच अनुभवून या लोकांचा त्याग करून अमर होतात.

या आधीच्या मंत्रात ऋषींनी आत्म्याचे ज्ञान-ज्ञेय-ज्ञान या त्रिपुटीपलीकडे असलेले स्वरूप स्पष्ट केले होते. 'अविज्ञातम् विजानताम्' - जे ज्ञानी आहेत त्यांच्या मते आत्मा हा नित्य ज्ञाता असल्याने तो अविज्ञात आहे. जाणणाऱ्याला कसे काय जाणणार? साधकाच्या मनातून परमात्म्याबद्दलची ही वेगळेपणाची जाणीव पूर्णपणे काढून टाकण्यासाठी ऋषींनी असे म्हटले होते, पण 'अविज्ञातम् विजानताम्' असे म्हणण्यात एक नकारात्मक भाव आहे. आत्मज्ञान्याचा आत्मानुभव हा काही असा नकारात्मक नव्हे. आत्मज्ञान्याच्या दृष्टीने आत्मा अज्ञेय आहे या विधानाचा अर्थ इतकाच की, तो इंद्रिये मन यांच्या सीमेत सामावता येत नाही. तो त्या सर्वांना व्यापून दशांगुळे उरला आहे. त्या आत्म्याच्या निरतिशय सघन, अखंड अस्तित्वाचा अपरोक्ष अनुभव त्याला येत असतो. आत्मज्ञान म्हणजे शून्यत्व नसून ते पूर्णत्व आहे. असा तो आत्मा अस्तित्वरूपाने असल्यामुळे त्याचा प्रत्यय येऊ शकतो. बुद्धीने जाणल्या जाणाऱ्या सर्व जाणिवांचे मध्ये ते जाणणे ज्याच्यामुळे होते तो आत्मा चैतन्य स्वरूपात, अविच्छिन्न



स्वरूपात व्यापून असतो. सर्व भूतमात्रात गूढपणे व्यापून राहणाऱ्या व साक्षी असणाऱ्या त्याच्या चेतन शक्तीलाच नित्य, अखंड, संपूर्ण, निर्विशेष असे वर्णिले आहे. असे हे ब्रह्म ज्ञानस्वरूप आहे. बुद्धी व इतर इंद्रिये यांना जे जे कळते हे सर्व याच ब्रह्मशक्तीमुळे, आपल्या प्रत्येक जाणिवेत तो परमात्माच असतो. प्रत्येक ज्ञानी व्यक्तीला याचा अनुभव येतो व असा अनुभव हा काही शून्याचा अनुभव असत नाही. तो सत्-चित्-आनंद स्वरूप पूर्ण परमात्म्याचा निःसंदिग्ध प्रत्यय असतो. तो आत्मानुभव हेच सर्व अनुभवांचे सार आहे. जागृती, स्वप्न, सुशूप्ती या तीन अवस्थांच्या पलीकडे असलेली ही आत्मानुभूती असल्यामुळे या अनुभवाला चौथी अवस्था म्हटले आहे. जे प्राप्त झाले असता अतीव शांती मिळते, द्वैत नाहीसे होते अशी ही अवस्था आहे.

आत्मा हा त्या आत्मचैतन्यामुळेच जाणला जातो. असे हे जाणणे संपले तरी आत्मा मात्र नित्य, सर्वव्यापी, अमर, अविनाशी, अजर असल्यामुळे त्याची अवस्था ही अखंड असते. अशा या आत्म्याचे ज्ञान ज्याला होते तो अमृतमय, अखंड आनंदत्वाचा अनुभव घेतो. अविद्या नष्ट झाल्यामुळे अनात्म अशा ज्या वस्तू त्या त्याच्यासाठी काही उरत नाहीत. अविद्येचा नाश झालेला असल्यामुळे त्याला सर्वत्र आत्मरूपच दिसत असते. प्रपंचादि वस्तूवरील आसक्ती नष्ट झाल्यामुळे त्याच्या ठिकाणी मर्त्य असे काही राहत नाही. सर्व प्रकारचे सर्व प्रत्यय हे ज्याचे विषय बनतात तो आत्मा सर्व प्रत्ययातून प्रकट होत असतो. तो सर्व प्रत्ययांचा चैतन्यस्वरूपाचा साक्षी आहे. म्हणून येथे ऋषी सांगतात की, आपल्या प्रत्येक अनुभवातून आपण खरोखरच त्या परब्रह्मालाच अनुभवीत असतो. जो आत्मज्ञानी असतो त्याला त्याचे सत्यस्वरूप समजते व जो अजाणता असतो त्याला अविद्येमुळे परब्रह्माच्या ठिकाणी जग दिसत असते. आपल्या सर्व प्रत्ययात आपला आत्माच आंतरबाह्य भरलेला आहे असे जाणणे व अपरोक्षपणे अनुभवणे हीच अमरत्वाची प्राप्ती होय. नाशवंत नामरूपात आत्म्याला जोडणे हे अज्ञान आहे. तो सदोदित अस्तित्वस्वरूपात असल्यामुळे त्याचे अस्तित्व कधीच नष्ट होत नाही. मनुष्याचा जन्म व मृत्यू या दोहोंच्याही पलीकडे तो असल्यामुळे त्याचे अमरत्व सिद्ध होते. वास्तविक जन्म-मृत्यू हे सर्व काही देहाला आहे. देहच जन्मत असतो व देहच मरत असतो. आत्मचैतन्य हे जन्मण्याआधीही होते व मृत्यूनंतरही राहणार, पण आत्मा मात्र सर्वव्यापी व नित्य राहणार.

असे हे आत्म्याचे स्वरूपभूत अमृततत्त्व प्राप्त करण्याचे सामर्थ्य आत्मज्ञानाने होऊ शकते असे उपनिषदकार येथे म्हणतात. मनुष्य जन्माचे सार्थक हे आत्मज्ञान करून घेण्यातच आहे. या मनुष्य जन्मात ब्रह्म जाणून घेण्याची

शक्ती ईश्वराने केवळ मनुष्याला दिली आहे. इतर कोणत्याही प्राण्यात हे आत्मज्ञान घेण्याची शक्ती भगवंताने ठेवली नाही. म्हणून 'नर करणी करे, तो नर का नारायण हो जाय ।' मनुष्याने जर ठरविले तर तो याच जन्मात ईश्वरस्वरूप बनू शकतो. जीव ब्रह्मरूप होणे यातच मनुष्य जन्माची खरी सार्थकता आहे, कारण मनुष्य जन्मसुद्धा कुराणांच्या दाखल्याप्रमाणे ८४ लक्ष योनीतून भटकूनच प्राप्त होत असल्यामुळे तो दुर्मिळ आहे. हे जर असे केले नाही तर आदिशंकराचार्य म्हणतात त्याप्रमाणे, 'पुनरपि जननम्, पुरपि मरणम्, पुनरपि जननी जठरे शयनम्.' जन्म-मरणाचे रहाटगाडगे असेच भोगावे लागणार आहे शिवाय कर्माप्रमाणे पुन्हा मनुष्य जन्मच नव्हे तर कोणतीही योनी जीवाला प्राप्त होऊ शकते व अनंत जन्माची दुःखे पुन्हा भोगायला नशिबी येतात. पण आत्मज्ञान प्राप्त झाले तर चारी देहांचा निरास करून मनुष्याला अमृतत्व प्राप्त होते. तो जेव्हा ब्रह्म जाणतो त्या वेळी तो ब्रह्मच होऊन राहतो. त्याला अशा ब्रह्मस्वरूप झालेल्या मनुष्याला देहादी उपाधी असल्यातरी त्यांच्यासह तो ब्रह्मरूपच असतो.

विवेक, वैराग्य, अहंता, ममता, देहात्मकता निघून गेली की जीवन जगत असतानाच या आत्मलाभाचा प्रत्यय अशा मनुष्याला येऊ शकतो. प्रत्येकात हे एकमेवाद्वितीय आत्मतत्त्वच मुळात विद्यमान आहे पण अज्ञान, अविद्या यांच्यामुळे जे जवळ असूनही आपल्याला प्राप्त होत नाही ते केवळ आत्मज्ञानानेच प्राप्त होऊ शकते. म्हणून या द्वितीय खंडातील शेवटच्या श्लोकात ऋषी कळवळीने सांगतात की, या जन्मीच हे आत्मज्ञान प्राप्त करून जन्माचे सार्थक करून घ्यावे.

००० 



# तृतीय खंड
## मंत्र पहिला

ब्रह्म ह देवेभ्यो विजिग्ये तस्य ह ब्रम्बणो विजये देवा अहमीतन्त ।।
त ऐक्षन्तास्माकमेवायं विजयो स्माकमेवायं महिमेति ।।१।।

### अन्वय

| | |
|---|---|
| ब्रह्म - ब्रह्माने | ह - च |
| देवेभ्यः - देवांसाठी | विजिग्ये - विजय मिळवला |
| ह - पण | तस्य ब्रह्मणः - त्या परब्रह्माच्या |
| विजये - विजयात | देवाः - इंद्र वगैरे देवांनी |

अगमीयन्त - आपल्या श्रेष्ठत्वाचा अभिमान बाळगला
ते इति ऐक्षन्त - ते असे समजायला लागले (की)

| | |
|---|---|
| अयम् - हा | अस्माकम् एव - तर आमचाच |
| विजयः - विजय | अयम् - हा |
| अस्माकम् एव - तर आपलाच | महिमा - महिमा |

### अर्थ

**अहंकार नाश हाच खरा आत्मज्ञानाचा मार्ग**

ब्रह्माने (असुराविरुद्धच्या युद्धात) देवांना विजय मिळवून दिला. ब्रह्माने त्यांच्यासाठी मिळविलेल्या या विजयामुळे देव अहंकाराने फुगले.

तद्धैषां विजज्ञौ तेभ्यो ह प्रादुर्बङ्गूव तन्न व्यजानत
किमिदं यक्षमिति ।।२।।

### अन्वय

ह तत् - प्रसिद्धच आहे की त्या परब्रह्माने
एषाम् - ह्या देवांच्या अभिमानास

| | |
|---|---|
| विजज्ञौ - जाणले | तेभ्यः - त्यांच्यासमोर |
| ह - च | प्रादुर्बभूव - प्रगट झाले |

तत् - त्यास (प्रगट झालेला पाहूनही)
इदम् - हा                    यक्षम् - यक्ष
किम् इति न व्याजानत - कोण आहे हे जाणले नाही

**अर्थ**

ते समजू लागले की हा आमचाच विजय आहे, हा आमचाच मोठेपणा आहे. देवांचा हा भाव ब्रह्माच्या लक्षात आला व ते देवांपुढे (यक्षाच्या रूपात) प्रकटले. हा यक्ष कोण हे देवांना उमगेना.

**ते ग्निमब्रुवञ्जातवेद एतद्विजानीहि किमिदं**
**यक्षमिति तथेति ।।३।।**

**अन्वय**

ते - त्या इंद्रादी देवांनी          अग्निम् - अग्निदेवास
अब्रुवन् - सांगितले                जातवेद - जातवेदा
एतत् विजानीहि - ह्या गोष्टीस चांगल्या प्रकारे ज्ञात करून घे (की)
इदम् यक्षम् - हा यक्ष              किम् इति - कोण आहे?
तथा इति - तेव्हा अग्निदेव म्हणाला, बरं ठीक आहे.

**अर्थ**

त्यावर त्यांनी आपल्यातील 'जातवेद' अर्थात जन्मतःच सर्वज्ञ म्हणून प्रसिद्ध असलेल्या अग्नीला म्हटले, 'पाहून ये बरं हा यक्ष कोण आहे ते.' 'ठीक आहे' असे म्हणून अग्नी कामगिरीवर निघाला.

**तदभ्यद्रवत् तमभ्यवदत्को सीत्यग्निर्वा अहमस्मीत्यब्रवीज्जातवेदा**
**वा अहमस्मीति ।।४।।**

**अन्वय**

तत् - त्याच्या समीप               (अग्निदेव) अभ्यद्रवत - धावत गेला
तम् - त्या अग्निदेवास              अभ्यवदत् - त्या दिव्य यक्षाने विचारले
कः अस्मि इति - तू कोण            अब्रवीत् - अग्निदेवाने म्हटले
अहम् - मी                        वै अग्निः - सुप्रसिद्ध अग्निदेव



अस्मि इति - आहे                  अहम् वै - मीच
जातवेदाः - जातवेद या नावाने       अस्मि इति - प्रसिद्ध आहे

**अर्थ**

अग्नी त्वरेने यक्षापाशी पोचला. यक्षाने विचारले, 'तू कोण?' 'मी अग्नी आहे. मला जातवेदाही म्हणतात,' अग्नी उत्तरला.

**तस्मिँ स्त्वयि किं वीर्यमित्यपीदँ सर्वं दहेयं यदिदं**
**पृथिव्यामिति ।।५।।**

**अन्वय**

तस्मिन् त्वयि - अशा तुझ्यात        किं वीर्यम् - काय सामर्थ्य
इति - सांग                        अपि पृथिव्याम् - पृथ्वीतील
यद् इदम् - जे काही आहे            इदम् सर्वम् - एकूण एक
दहयेम् इति - जाळू शकतो

**अर्थ**

'काय बरे तुझे वैशिष्ट्य किंवा सामर्थ्य' या यक्षाच्या प्रश्नावर अग्नी उत्तरला, 'हे सर्व काही, पृथ्वीवर जे काही आहे ते सारे, मी जाळून टाकू शकतो.'

**तस्मै तृणं निदधावेत्तदहेति । तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न शशाक**
**दग्धुं स तत एव निववृते नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति ।।६।।**

**अन्वय**

(तेव्हा त्या दिव्य यक्षाने) तस्मै - त्या अग्निदेवासमोर
तृणम् - एका गवताचे पाते          निदधौ - टाकले (अन्)
इति - असे                        एतत् दह - ह्याला जाळ
सः - तो अग्निदेव                  सर्वजवेन - पूर्ण शक्तिनिशी
तत् उपप्रेयाय - त्या पात्यावर तुटून पडला (पण)
तत् दग्धुम् - त्याला जाळण्यास
न एव शशाक - कोणत्याही प्रकारे समर्थ होऊ शकला नाही

ततः निववृत्ते - तेव्हा तिथून परतला (अन् देवांना म्हणाला);
एतत् - हे विज्ञातुम् - जाणण्यास
न अशकम् - मी समर्थ झालो नाही
एतत् - हा यक्षम् यत् इति - यक्ष कोण

## अर्थ

त्याच्यासमोर एक गवताची काडी टाकून यक्ष म्हणाला, 'ही जाळ बघू.' पण आपल्या सर्व शक्तिनिशी प्रयत्न करूनसुद्धा अग्नी तिला जाळू शकला नाही. तेव्हा तो परतला व म्हणाला, 'हा यक्ष कोण ते काही जाणू शकलो नाही.'

केनोपनिषदाच्या मागील दोन खंडांत मोक्षाची इच्छा असलेल्या जिज्ञासू शिष्याला त्यांनी विचारलेल्या प्रश्नांवरून ऋषींनी आत्मज्ञान सांगितले. आत्मज्ञानाचा हा मार्ग अतिशय जटिल, दुर्बोध, दुष्कर व गूढ असल्यामुळे या तिसऱ्या व चौथ्या खंडात आख्यायिकेच्या माध्यमातून या साधनेचा सोपा मार्ग विशद करण्यात आला आहे. या गुरू-शिष्यांच्या संवादातून परब्रह्माची महती सांगितली आहे. आत्मज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी साधकाने पात्र होणे हे महत्त्वाचे आहे. ही पात्रता येण्यासाठी या मार्गात अहंकारासारखा दुसरा शत्रू नाही. चित्तशुद्धी हा परमार्थाचा पाया आहे. अंतःकरणशुद्धी होण्यासाठी चित्तात साठलेली जन्मजन्मांतरीची जळमटे निघून गेली पाहिजेत. द्वेष, मत्सर असे विकार नष्ट झाले पाहिजेत. चित्तातील विक्षेप निघून गेला पाहिजे. काम, क्रोध, लोभ हे या मार्गातील फार मोठे अडथळे आहेत. या विकारांचे उदात्तीकरण व विभूतीकरण झाले पाहिजे. या तिसऱ्या खंडात गुरूंनी शिष्याला अहंकार नाशाचा मंत्र कथेच्या माध्यमातून उपदेशिला आहे. आत्मज्ञानाच्या मार्गावर असणाऱ्यांनी या सर्वांचा त्याग केला पाहिजे. वैराग्य व ज्ञान यांनी संपन्न होऊन लहान बालकासारखे निष्पाप, निर्विषयी व्हायला पाहिजे. आत्मज्ञानामुळे अमरत्व व परमशांती लाभते म्हणून अनेक साधक उतावीळपणे या राजमार्गावर चालण्याचा प्रयत्न करतात. पण कामक्रोधादिकांच्या अधीन असल्यामुळे या मार्गात त्यांची पीछेहाट होते. शमदमाचा तंतोतंत अवलंब न झाल्यामुळे देहात्मकता पूर्णपणे गेलेली नसते त्यामुळे प्रगती शीघ्र होत नाही. आत्मज्ञान प्राप्त केलेल्या यशस्वी साधकांची चरित्रे जशी आपण अभ्यासितो तशी या मार्गामध्ये अयशस्वी झालेल्या साधकांची चरित्रे हीसुद्धा मार्गदर्शक ठरू शकतात.

अहंकार या सर्वांत मोठ्या शत्रूच्या स्वरूपासंबंधी गुरूंनी या अध्यायात उपदेश केला आहे. मनुष्याला व्यावहारिक जीवनात जेव्हा यश मिळते त्या



वेळी त्याच्यातील कर्तृत्वभाव जागा होतो. सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, कीर्ति जशी मिळायला लागते तसा मीपणाचा अहंभाव, मिथ्याभिमान वाढायला लागतो. माझ्याच बुद्धीच्या जोरावर व माझ्याच कर्तृत्वशक्तीमुळे मी हे यश प्राप्त केले असा भाव त्याच्या अंतःकरणात निर्माण होतो. अहंभाव पुष्ट झाल्यामुळे तो ईश्वरतत्त्वाला विसरतो. या जगात परमेश्वर सर्वत्र भरून राहिला आहे तसा तो माझ्या अंतःकरणातही अंशरूपाने आहे याचे त्याला भान राहत नाही. ईश्वरी इच्छेशिवाय झाडाचे पानसुद्धा हालत नाही एवढा तो सर्व शक्तिमान आहे. वास्तविक तो यंत्री आहे व आपण यंत्र आहोत. संत तुकारामांनी म्हटल्याप्रमाणे, 'कुणाचीये सत्ते चाले हे शरीर । - आपुलिया बळे नाही मी बोलवत । सखा कृपावंत वाच्या त्याची ।' हे सत्य आहे. असे असताना केवळ अहंकारामुळे 'मी माझे मी माझे' असे म्हणत असतो. ईश्वराच्या कृपेने व त्याच्याच शक्तीने हे सर्व प्राप्त झाले असताना त्याची कृतज्ञता न मानता खोट्या अभिमानाने यशाचे श्रेय आपण स्वतःकडे घेतो.

ईश्वर हाच नियंता असून तोच खरा आत्मरूप असतो. तोच खरा साक्षी व आपल्या सर्व क्रिया व त्यांच्या फळाचे नियंत्रण करणारा असतो. मनादि देहाच्या उपाधी गेल्या की, हाच जीव वास्तविक ईश्वररूपच आहे एवढे आपले आणि भगवंताचे अतूट नाते आहे. त्यामुळे आपल्या प्रत्येक कृतीला तोच कारण असतो याचा विसर आपल्याला झालेला असतो.

या तिसऱ्या खंडातील पहिल्या श्लोकात देव व असुर यांच्या संग्रामाची कथा यासाठी सांगितली आहे. देव आणि असुर यांचा घोर संग्राम झाला. असुरांची तमोवृत्ती घालविण्यासाठी ईश्वराने देवांना माध्यम करून असुरांचा पराभव घडविला. वस्तुतः देव हे निमित्तमात्रच होते. विजय प्राप्त झाल्यावर देवांनी ईश्वराविषयीची कृतज्ञता व्यक्त करावयास हवी होती, पण देवांचा भ्रम असा झाला की, हा विजय आपणच आपल्या बळावर मिळविला आहे, त्यामुळे देव मधांध होऊन अहंकाराने फुलून गेले. देव म्हणजे दैवीगुणांनी संपन्न असलेले व सत्प्रवृत्तींनी वाटचाल करणारे. या दैवीप्रकृतीचा विजय म्हणजे त्या ईश्वरीशक्तीचाच विजय. असे असताना या देवांना खोट्या अहंकारामुळे दंभ निर्माण झाला. अशा वेळी या अहंकारामुळे देवांचे देवपण नष्ट होऊ नये म्हणून त्यांचा अहंकार दूर करण्यासाठी परब्रह्माने एका तेजस्वी यक्षाचे रूप घेतले. ईश्वराला देवांविषयी करुणा आल्यामुळे त्यांच्यावर कृपा करून त्यांचे डोळे उघडण्यासाठी प्रत्यक्ष भगवंत तेजस्वी यक्षाच्या रूपात देवांसमोर प्रगट झाले. अशा वेळी अहंकाराच्या मस्तीत असलेल्या देवांनी ईश्वराला ओळखले नाही. हा अपरिचित कोण आहे हे जाणून घेण्यासाठी

देवांनी अग्नीला ईश्वराकडे पाठविले. देवात आपणच अधिक लायक आहोत म्हणून आपल्याला ही जबाबदारी पेलावी लागली अशा समजुतीने त्याचा अहंकार अधिकच वाढला. अग्नी आपल्या ज्वाळा फडकावित ईश्वरासमोर आला. यक्षानेच त्याला पाहून प्रश्न विचारला, 'कोण रे तू?' तेव्हा अग्नी म्हणाला, 'मी वेदीतून निर्माण झालो असून सर्व ब्रह्मांड जाळण्याचे सामर्थ्य माझ्याजवळ आहे. मला जातवेद म्हणतात.' तेव्हा यक्षरूपातील भगवंत म्हणाले, 'असं म्हणतोस तर मग ही एक काडी जाळून तिची राख करून टाक बरं.' असे म्हणून यक्षाने एक गवताची काडी अग्नीसमोर टाकली. अहंकाराने भरलेल्या अग्नीला एवढा विवेकसुद्धा नव्हता की, या गूढ गोष्टीमागे काही दैवीशक्ती असावी. अग्नी सर्वशक्ती एकवटून त्या गवताच्या काडीवर आदळला पण प्रयत्न करूनही त्याला ती लहानशी काडी जाळता आली नाही. अग्नी तिथून पराभूत, अपमानित होऊन परत फिरला व आल्यानंतर त्याने सर्वांना सांगून टाकले की, हा यक्ष कोण आहे, हे काही मी जाणू शकलो नाही.

**अथ वायुमब्रुवन् वायवेतद्विजानीहि किमतेद्यक्षमिति तथेति ।।७।।**

**अन्वय**

अथ - तेव्हा (देवाः) वायुम् - देव वायूला
अब्रुवन् - म्हणाले वायो - हे वायो
किम् एतत् यक्षम् इति - कोण हा यक्ष आहे बरे
एतत् विजानीहि - हे जाणून घे तथा इति - ठीक

**अर्थ**

अग्नी यक्षाला जाणण्यास असमर्थ ठरला तेव्हा देवांनी वायूला म्हटले, 'हे वायो, हा कोण यक्ष आहे ते जाणून घे बरे.' 'ठीक आहे' असे त्यावर वायू उत्तरला.

**तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्को सीति । वायुर्वा अहमस्मीत्यब्रबीन्मातरिश्वा वा अहमस्मीति ।।८।।**

**अन्वय**

तत् - त्याच्याजवळ अभिअद्रवत् - धावत गेला



तम् - त्याला अभिअवदत् - (यक्षाने) विचारले
कः असि इति - कोण आहेस तू बरे?
अहम् पै वायुः अस्मि - मी प्रसिद्ध वायू आहे
अति अब्रवीत् - असे म्हणाला
अहम् वै मातरिश्वा - मी मातरिश्वा म्हणूनही प्रसिद्ध आहे

**अर्थ**

वायू त्वरेने यक्षाजवळ पोचताच यक्षाने त्याला 'तू कोण?' असे विचारताच वायू उत्तरला - मी तो प्रसिद्ध वायू. मातरिश्वा म्हणूनही मला ओळखतात.

**तस्मिँ स्त्वयि किं वीर्यमित्यपीदँ सर्वमाददीयं यदिदं पृथिव्यामिति ।।९।।**

**अन्वय**

तस्मिन् त्वयि - तशा तुझ्यात किम् वीर्यम् इति - काय सामर्थ्य आहे बरे
पृथिव्याम् यत् इदम् सर्वम् - अहो पृथ्वीत जे हे सर्व आहे
इदम् आददीयम् - हे (मला) ग्रहण करण्यायोग्य आहे

**अर्थ**

इतक्या प्रसिद्ध अशा तुझ्यात काय विशेष शक्ती आहे बरे? या यक्षाच्या प्रश्नी वायू उत्तरला, 'मी पृथ्वीवरचे हे सर्व ग्रहण करू शकतो अर्थात उडवून नेऊ शकतो.'

**तस्मै तृणं निदधावेत्तदादस्वेति । तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न । शशाकादातुं स तत एव निववृते, नैतिदशकं विज्ञातुं । यदेतद्यक्षमिति ।।१०।।**

**अन्वय**

(त्यावर यक्षाने) तस्मै - त्याच्यासमोर तृणं - गवताची काडी
निदधौ - ठेवली एतत् आदत्स्व इति - हे ग्रहण कर बघू
सः सर्वजवेन तत् उपप्रेयाय - तो (वायू) सर्व शक्तिनिशी त्याचे ग्रहण करण्यास गेला

तत् आदातुम् न शशाक - त्याला ग्रहण करू शकला नाही
ततः एव निववृते - म्हणून तो परतला
अतत् विज्ञातुम् न अशकम् - (व म्हणाला) हे जाणू शकलो नाही
एतत् यक्षम् इति - की हा यक्ष कोण बरे

### अर्थ

यक्षाचे आव्हान स्वीकारून वायू सर्व शक्ती एकवटून ती गवताची काडी उडविण्यास गेला पण ती उडवू शकला नाही. तेव्हा देवांपाशी परतून तो म्हणाला, नाही जाणू शकलो कोण हा यक्ष ते.

**अथेन्द्रमब्रुवन्मघवन्नेतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति तथेति**
**तदभ्यद्रवत्तस्मात्तिरोदधे ॥११॥**

### अन्वय

अथ - आता इन्द्रम् अब्रुवन् - (देव) इंद्राला म्हणाले
माधवन् किम् अतत् यक्षम् इति एतत् विजानीहि - इंद्रा, कोण हा यक्ष आहे ते जाणून घे)
तथा इति - (इंद्र उत्तरला) ठीक आहे
तत् अभिअद्रवत् - त्याच्याकडे धावत गेला
तस्मात् तिरोदधे - तेव्हा तो अंतर्धान पावला

### अर्थ

वायूचा पराभव झाल्यावर देवांनी इंद्राला म्हटले, 'हे माधवन्, हा यक्ष कोण ते जाणून घे बरे', 'ठीक आहे', असे म्हणून इंद्र त्वरेने निघाला; पण तेवढ्यात यक्ष तेथून अंतर्धान पावला.

**स तस्मिन्नेवाकाशे स्त्रियमाजगाम बहुशोभमानामुमाँ हैमवती ताँ**
**होवाच किमेतद्यक्षमिति ॥१२॥**

### अन्वय

सः - तो इंद्र
तस्मिन अव आकाशे - (जिथे यक्ष होता) त्याच ठिकाणी



बहुशोभनाम् हैमवतीम् उमाम् स्त्रियम् आजगाम - अत्यंत रूपवान सुवर्णकांतिमयी किंवा हिमालयपुत्री उमादेवीपाशी आला
तां ह उवाच - (आणि) तिला म्हणाला
एतत् यक्षम् किम् इति - हा यक्ष कोण बरे?

### अर्थ

जिथे यक्ष होता त्याच जागी इंद्राला अत्यंत रूपवती सुवर्णकांतिमयी अशी देवी हिमालय कन्या उमा दिसली. तिच्यापाशी येऊन त्याने विचारले, 'हा यक्ष कोण बरे?'

अग्नीचा स्वतःविषयी असलेला गर्व नाहीसा झाल्यावर सर्व देवांनी वायूला यक्षाकडे पाठविले. वायू आपल्या नेहमीच्या थाटात ईश्वराकडे आला तेव्हा यक्ष त्याला म्हणाला, 'काय रे बुवा, तू कोण आणि हा काय खटाटोप चालविला आहेस?' हा प्रश्न वायूला आवडला नाही त्याच्या अहंकाराला हा धक्काच होता तेव्हा वायू म्हणाला, 'अरे जगप्रसिद्ध वायू तो मी, माझे बळ अनिवारणीय असे आहे, मला मातरिश्वा अशी पदवी आहे. माझ्या प्रवाहाच्या सामर्थ्याने मी हे सारे विश्व उधळून लावू शकतो.' भगवंताने ती गवताची काडी उडवून दाखव असे वायूला सांगितले. पण वायूचीसुद्धा दशा अग्नीसारखीच झाली. त्याने रौद्ररूप धारण केले, वादळे उठविली, पण इवलीशी काडी काही हलेना. शेवटी थकून धापा टाकत तो देवांकडे परतला. परमात्म्याच्या शक्तीने शक्तिमान होऊन सर्व काही जाळण्याची व उडवून देण्याची शक्ती लाभलेले अग्नी आणि वायू यांची अहंकारामुळे फटफजिती झाली. दोघांचीही गाळण उडाली. नंतर सर्व देवांनी इंद्राला गळ घातली की तुम्ही हा अद्‌भुत यक्ष कोण आहे हे गूढ उकलून काढा. इंद्र हा सर्व देवांचा राजा, त्यामुळे तो इतर देवांपेक्षा अनेक बाबतीत श्रेष्ठ होता. तेव्हा त्याचा अहंकारही तसाच मोठा होता. अग्नी आणि वायूसारखा त्याच थाटात तो यक्षाकडे निघाला, पण त्याला पाहून यक्ष तिथून अंतर्धान पावला. अग्नी आणि वायूला निदान यक्षाबरोबर बोलण्याची संधी मिळाली होती पण इंद्राच्या वाट्याला हेही भाग्य लाभले नाही. असुरांवर विजय मिळविल्यामुळे इंद्रालासुद्धा अवास्तव अभिमान आला होता. मी देवतांचा राजा आहे अशा दंभाने इंद्र यक्षासमोर गेल्यावर यक्षच गुप्त झाला. आपल्याला यक्षाबरोबर संभाषणही करण्याची संधी मिळाली नाही यामुळे त्याचा अहंकार आणखीनच दुखावला. पण या संकटामुळे इंद्र अंतर्मुख झाला व चिंतन करू लागला. असे चिंतन होता होता त्याचा अभिमान दूर होत गेला. या आत्मपरीक्षणाने आपल्यातल्या कुठल्या दोषामुळे यक्ष निघून गेला याचा तो

गंभीरतेने विचार करू लागला. आपल्या या अपयशाला आपणच जबाबदार आहोत याचा बोध त्याला व्हायला लागला.

इंद्राची ही अवस्था पाहून हिमालयनकन्या उमा, स्त्रीरूपात व विद्येच्या स्वरूपात त्याच्या अंतरंगात प्रकट झाली. परमेश्वराचे स्नेहल मातृरूप - साक्षात जगद्जननी महामाया तिथे आविर्भूत झाली. मनुष्याच्या बंधनाचे आणि मोक्षाचेही कारण असणारी माया इंद्राला ज्ञान देण्यासाठी इथे आविर्भूत झाली. प्रत्यक्ष शांकरी विद्येची मूर्ती असलेली व आपल्या तेजाने शोभणारी ज्ञानरूपीनी उमादेवी तेथे प्रकट झाली. ती शुभ करणारी सुवर्णप्रभेसारखी शिवपत्नी पाहून इंद्राने अत्यंत नम्रतापूर्वक तिला विचारले, 'हे देवी! आताच जो इथे प्रगट होता आणि नंतर जो गुप्त झाला तो अत्यंत बलवान कोण होता? त्याला जाणून घेण्यासाठी मी अतिशय उत्सुक आहे. त्याच्या त्या गूढ जाण्याने मी अत्यंत अस्वस्थ झालो आहे.'

000



# चतुर्थ खंड

## मंत्र - एक, दोन व तीन

**सा ब्रह्मेति होवात ब्रह्मणो वा एतद्विजये महीयध्वमिति ततो हैव विदाञ्चकार ब्रह्मेति ।।१।।**

### अन्वय

**उमादेवीचा उपदेश**

सा - ती ह उवाच - म्हणाली

ब्रह्म इति - (इंद्राने ज्याच्याजवळ पृच्छा केली तो यक्ष म्हणजे) ब्रह्म होय

ब्रह्मम: वै एतत् विजये - वस्तुतः ब्रह्माच्या या विजयातच

महीयध्वम् इति - तुम्ही स्वतःचा महिमा मानू लागला होता

ततः एव ब्रह्म इति विदाञ्चकार - यामुळेच हे ब्रह्म असे (इंद्राला) ज्ञान झाले

### अर्थ

त्या विद्येमुळे अतीव शोभायमान भासणाऱ्या उमेने इंद्राच्या प्रश्नाला उत्तर दिले की, 'ज्याच्याबद्दल तुम्हा देवांना प्रश्न पडला होता तो यक्ष म्हणजे ब्रह्म होय. ज्या असुरांवरील विजयाला तुम्ही स्वतःचा विजय समजून फुशारकी मारत होता तो खरोखर ब्रह्माचाच विजय होता. त्याच्या विजयामुळे तुम्हाला मोठेपण मिळाले होते,' अशा प्रकारेच इंद्राने ब्रह्माचे रूप जाणले.

**तस्माद्वा एते देवा अतितरामिवान्यान् देवान्यदग्निर्वायुरिन्द्रस्ते ह्येनन्नेदिष्ठ पस्पृशुस्ते ह्येनत्प्रथमो विदाञ्चकार ब्रम्हेती ।।२।।**

### अन्वय

तस्मात् वै - म्हणूनच

यत् अग्निः वायुः इंद्र : - जे अग्नी-वायू - इंद्र या नावांनी प्रसिद्ध आहेत

एते देवाः अन्यान् देवान् अतितराम् इव - ते हे देव अन्य देवांपेक्षा जणू श्रेष्ठ आहेत

हि - कारण

ते एनत् नेदिष्ठम् पस्पृशुः - त्यांनी अत्यंत निकटतेने (परब्रह्माला) स्पर्श केला

ते हि एनत् प्रथमः ब्रह्म इति विदाञ्चकार - त्यांनीच याला सर्वप्रथम ब्रह्म म्हणून जाणले

**अर्थ**

म्हणूनच अग्नी-वायू-इंद्र हे देव इतर देवांपेक्षा श्रेष्ठ ठरले, कारण त्यांनी परब्रह्माला जवळून स्पर्श केला. त्याला परब्रह्म म्हणून सर्व देवांमध्ये त्यांनीच प्रथम जाणले.

**तस्माद्वा इन्द्रो तितरामिवान्यान्देवान्स ह्येनन्नेदिष्ठं पस्पर्श स ह्येनत् प्रथमो विदाञ्चकार ब्रह्मेति ।।३।।**

**अन्वय**

तस्मात् वै इन्द्रः अतितराम् इव अन्यान् देवान् - म्हणूनच इंद्र अन्य देवांपेक्षा श्रेष्ठ ठरला

हि सः एनत् नेदिष्ठम् पस्पर्श - कारण तोच याला जवळून स्पर्श करता झाला

हि सः एनत् प्रथमः ब्रह्म इति विदाञ्चकार - कारण त्यानेच याला प्रथम ब्रह्म म्हणून जाणले

**अर्थ**

म्हणून इंद्र इतर सर्व देवतांपरीस श्रेष्ठ ठरला, कारण त्यानेच ब्रह्माला अगदी जवळून स्पर्श केला; त्यानेच सर्वप्रथम त्याला ब्रह्म म्हणून जाणले.

विद्यारूपीनी उमादेवी आता इंद्राला ब्रह्मज्ञान देत आहे. इंद्रसुद्धा अंतर्मुख होऊन हे जाणण्यासाठी उतावीळ झाला आहे. त्याची ही तळमळ पाहून उमादेवी त्याच्यावर प्रसन्न झाली आहे. ती म्हणाली, 'हे प्रत्यक्ष ब्रह्म असून त्याने यषाचे रूप घेऊन तुमचा अहंकार नाश करण्यासाठी ते प्रकटले होते, तुम्ही असुरांचा पराभव करून यज्ञांचे जे रक्षण केले त्याला परमेश्वराचा संकल्पच जबाबदार आहे.' अग्नी-वायू व तू त्या परमेश्वराच्या शक्तीने कार्यरत होता.



हे सर्व त्या परमेश्वराचे मोठेपण आहे. ब्रह्म म्हणजे ज्याने सर्व अस्तित्व व्यापून टाकले आहे असे एकमेवाद्वितीय परमतत्त्व. बृह - व्यापने या धातूपासून ब्रह्म हा शब्द तयार झाला आहे. साधकांचा अहंकार, भ्रम दूर करण्यासाठी गुरूरूपात हे तत्त्व प्रकट होते. गुरू म्हणजे ते सच्चिदानंदच म्हणून गुरूसंबंधी मनुष्यभाव बाळगू नये. इष्ट दर्शन होण्यापूर्वी शिष्याला प्रथम गुरूचे दर्शन घडते ते गुरूदेवच शिष्याला इष्ट देवतेचे दर्शन घडवितात. म्हणून शिष्याने गुरूला आणि इष्ट देवतेला अभिन्न पाहिले पाहिजे. गुरूशिवाय ब्रह्मज्ञान होत नाही ही गोष्ट उपनिषदात अनेक ठिकाणी सांगितली आहे. इथेसुद्धा इंद्राला ब्रह्मज्ञान प्राप्त होण्यापूर्वी ब्रह्माशी अभिन्न अशा उमेचे दर्शन झाले आहे. तिच्याच उपदेशामुळे इंद्राला ब्रह्मज्ञान झाले. इंद्राचा भ्रमनिरास झाला, अज्ञान नष्ट झाले, खोटा मीपणा दूर झाला. अशी जेव्हा अवस्था झाली त्या वेळी इंद्राला ब्रह्माचा प्रत्यय आला.

वायू-अग्नी व इंद्र ह्या देवतांचे ब्रह्माच्या समीप गेल्यामुळे त्यांनाच परब्रह्माचे स्वरूप प्रथम समजले. इंद्राला उमादेवीचे शिष्यत्व लाभून त्याला सर्वप्रथम ज्ञान झाल्याने तो देवतांमध्ये श्रेष्ठ झाला. या इंद्रादि देवतांना लक्ष्यार्थ आहे. वायू देवता म्हणजे नाक, अग्नी म्हणजे दोन डोळे व इंद्र म्हणजे अंतःकरण अशी रुपके येथे केली आहेत. या इंद्रियांना स्वतःच्या सामर्थ्यावर परब्रह्माला जाणता येत नाही. पण मन जेव्हा त्यांच्यासह लीन होते तेव्हाच त्याला परब्रह्माचे ज्ञान होते. नाक व डोळे यांना जरी स्वसामर्थ्याने ब्रह्माला ओळखता येत नसले तरी अंतःकरण मात्र संपूर्ण शुद्ध होऊन त्याला जाणू शकते. त्याला जाणण्यामध्ये जे जे प्रतिबंध येतात त्यांचे निवारण करण्याचे काम त्याची आत्मचेतनाच करते. काम क्रोधादि विकार जेव्हा नाहीसे होतात त्या वेळी अंतःकरणात दैवीगुण प्रकटतात. असे दैवीगुण प्रतिष्ठित होणे म्हणजेच आत्मज्ञान प्राप्त होणे. अशा या ब्रह्माची मनुष्याला उपासना करता यावी म्हणून ते ब्रह्म यक्षरूप धारण करून इंद्रियांना जाणण्यासारख्या 'अधिदैवरूपाने' प्रगट झाले.

ईश्वराचे यथार्थ स्वरूप ओळखणे हेच ईश्वरत्व पावण्याचे लक्षण आहे. बाह्य उपानिधी ईश्वर वश होत नाही. पण अंतरंगाच्या साधनेने ते प्राप्त होऊ शकते. अशी साधना जेव्हा इंद्राकडून झाली तेव्हा त्याच्या जाणिवेच्या स्पंदनात सच्चिदानंद परब्रह्मच स्फुरू लागले. इंद्राचे अज्ञान, भ्रम, अहंकार नष्ट होऊन त्याला आत्मज्ञान प्राप्त झाले. ते उमादेवीच्या उपदेशामुळे, तिच्या आदेशानेच इंद्र ब्रह्मज्ञान प्राप्त करू शकला.

०००

## मंत्र - चार, पाच व सहा

**तस्यैष आदेशो यदेतद्विद्युतो व्यद्युतदा ३ इतीन्न्यमीमिषदा ३**
**इत्याधिदैवतम् ।।४।।**

### अन्वय

तस्य एष आदेशः - त्याच्याबद्दल असा आदेश आहे
यत् एतत् विद्युतः व्यद्युतत् आ इति - ज्या प्रमाणे या विजेचे चमकणे असते
इत् - तसे आणि जशी
न्यमीमिषत् आ ३ - डोळ्यांची उघडझाप असते
इति अधिदैवतम् - हे (ब्रह्माचे) अधिदैविक रूप आहे

### अर्थ

परब्रह्माच्या उपासनेबद्दल असा आदेश आहे. जशी आकाशात क्षणभर वीज चमकून जाते किंवा जशी डोळ्यांची पापणी लवते तसे क्षणभर साधकासमोर परब्रह्माचा आभास तरळून जाते. ही परब्रह्माची देवताविषयक किंवा इंद्रियांना गोचर अशी उपमा होय.

**अथाध्यात्मं यदेतद्गच्छतीव च मनो नेन चैतदुपस्मरत्यक्षीक्ष्णँ**
**संकल्पः ।।५।।**

### अन्वय

अथ - यानंतर
अध्यात्मम् - अध्यात्म-उपासना
तत् एतत् गच्छति अव च - जे हे जणू गमन करते
एतत् उपस्मरति - आणि जे प्रेमाने स्मरण करते
अनेक अभीक्ष्णम् संकल्पः - ज्याद्वारे सतत संकल्प करते
मनः - ते मन

### अर्थ

यानंतर परब्रह्माची आध्यात्मिक उपमा सांगितली जाते. जे 'जाते' असे



वाटते, जे सतत जवळून प्रेमानें स्मरण करते व सतत संकल्प करीत असते ते 'मन' परब्रह्माची आध्यात्मिक उपमा आहे.

**तद्ध तद्वनं नाम तद्वनमित्युपासितव्यं ।**
**स य एतदेव वेदाभि हैनँ सर्वाणि भूतानि संवाञ्छन्ति ।।६।।**

### अन्वय

तत् - ते (परब्रह्म)
तद्वनम् नाम ह - 'तद्वन' नावाने प्रसिद्ध आहे
तद्वनम् इति उपासितव्यम् - तद्वन म्हणून, त्या भावाने त्याची उपासना करायला हवी
सः यः एतत् एमम् वेद - तो जो साधक असे जाणतो
एनम् ह सर्वाणि भूतानि अभिसवांच्छन्ति - त्याला सर्व प्राणिमात्र हृदयापासून सर्वप्रकारे चाहतात

### अर्थ

ते परब्रह्म 'तद्वन' (म्हणजे प्राणिमात्रांचे प्राप्तव्य-गन्तव्य) या नावाचे आहे. या भावाने, अर्थात ते परब्रह्म सर्व जिवांचे परम प्राप्तव्य आहे, परमप्रिय आहे असे जाणून त्याची उपासना करायला हवी. जो साधक हे अशा प्रकारच्या उपासनेद्वारे जाणतो (अर्थात त्याप्रमाणे करतो) तो सर्व भूतमात्रांचा आवडता होतो.

## तीन प्रकारच्या उपासना

वरील तीन श्लोकांमध्ये अधिदैव ब्रह्मोपासना, अध्यात्म ब्रह्मोपासना व वन ब्रह्म उपासना अशा तीन उपासनांचे स्वरूप विशद केले आहे.

आकाशात विजेचा लोळ प्रगटला की सर्व काही क्षणार्धात उजळून निघते त्याप्रमाणे यक्ष प्रगट होऊन गुप्त झाला किंवा पापणी ज्याप्रमाणे क्षणात उघडून बंद होते त्याप्रमाणे यक्ष प्रगट होऊन गुप्त झाला. इंद्रियांना जाणवणारी म्हणजे आधिदैविक परब्रह्माची उपासना चौथ्या श्लोकात सांगितली आहे. वीज आणि डोळ्याची पापणी या दृष्टांताद्वारे यक्षाचे येणे वर्णिले आहे. यक्षाच्या रूपात क्षणभरासाठी परब्रह्म आले व अंतर्धान पावले तसेच साधकाच्या अंतरंगात परब्रह्माचा एक आभास अल्पकाळासाठी चमकून नाहीसा झाला. विजेच्या

चमकण्याप्रमाणे किंवा डोळयांच्या उघडझापेप्रमाणे ब्रह्मज्ञान अल्पकाळ जरी अंतःकरणात ठसले तरी ते पिंड ब्रह्मांडाचा निरास करण्यास पुरेसे असते. त्यामुळे ते ज्ञान झाले असता जड व चेतन इत्यादी भेद नाहीसे होतात. विजेचे चमकणे व डोळयांची उघडझाप होणे यांना अधिदैवतम् म्हणजे देवताविषयक ब्रह्माचे रूप म्हटले आहे. देवताविषयक म्हणजे देवतामधून प्रकट होणाऱ्या ब्रह्माचा उपासनेला उपयुक्त असा दृष्टांत आहे. विद्युत ही एक देवता आहे व इंद्रियांनाही देवता म्हणतात. देव शब्दाचा अर्थ प्रकाशक असा होतो. इंद्र, वरुण, विद्युत इत्यादी प्रकाशमान विभूती अथवा ज्याच्याद्वारे हे जग प्रकाशमान होते ती इंद्रिये यांना म्हणूनच देव अशी संज्ञा आहे. उघडझाप करणाऱ्या डोळयामधून प्रकटलेले 'दृष्य' हे जसे परब्रह्माचे अधिदैविक रूप तसेच विजेची लखलख हेही अधिदैविक रूप होय. असे ब्रह्म जेव्हा अल्पकाळ नामरूपाने प्रगट होते तेव्हा ते साधकांसाठी पूजा करावयास योग्य अशा अधिदैवकरूपाने असते. सर्वत अवस्थित, नामरूपापलीकडे असलेल्या निर्गुण, निराकार, सर्वव्यापी अशा परमतत्त्वाचा अनुभव आपल्याला येत नसेल पण तो यावा अशी तळमळ असेल तर त्याची नामरूपातून कल्पना करण्याचा प्रयत्न करा, असे ऋषी सांगतात. स्वाभाविक प्रतीकांद्वारे अंतःकरणातील भाव प्रगट होऊ शकतो.

पाचव्या मंत्रात ऋषी परब्रह्माचे मनुष्याच्या मनात प्रकटलेले आध्यात्मिक उपासनेचे अंग सांगतात. यातील प्रतीक म्हणजे मन. मन हे ब्रह्माचे आध्यात्मिक प्रतीक आहे असे म्हटले आहे.ब्रह्माचे चिंतनदेखील या मनानेच होते. म्हणून मन हे परब्रह्माच्या उपासनेसाठी एक स्वाभाविक प्रतीक आहे. मनाच्या संकल्प, श्रुति इत्यादी कार्यांतून ब्रह्मच जणू विषयभूत होत असते.

मनाने आत्मा जाणता येत नाही. कारण ते जड आहे असा शास्त्राचा निश्चय आहे. म्हणून मनाला जे आकलन करता येत नाही त्याचे ज्ञान त्याला होणे संभव नाही असे आपल्याला वाटते. पण ब्रह्माचे अधिदैवरूप क्षणभरही पाहिल्यानंतर मनात त्याची स्मृती उमटते व त्यात ते मन गुंतून राहते. असे विभूतीकरण झालेले मन ते ब्रह्मरूप होऊनच त्या त्या देहात राहते. म्हणून अशा मनाला ऋषींनी अध्यात्मब्रह्म समजावून सांगितले आहे. बद्ध झालेल्या जीवांना भोक्ताभोग्य जाणिवेने परब्रह्माचे ज्ञान व्हावे म्हणून ऋषी येथे उपाय सांगत आहेत. कारण प्रतीकाद्वारे उपदेशिलेले ब्रह्मच प्रपंचातील सामान्य जनांना होणे संभव आहे. यासाठी हा उपदेश केला आहे. केवळ निरूपाधिक ब्रह्माचे ज्ञान अल्पबुद्धीच्या लोकांना होणे शक्य नाही.

प्रतीकाच्या आधारे साधकाने परब्रह्माचा लाभ करून घ्यावा असे मागील दोन मंत्रांत ऋषींनी सांगितले. आता सर्वांना सहजपणाने आचरता येईल अशा



नामसाधनेचा उपदेश येथे ऋषी करीत आहेत. नामामागोमाग नामी येत असतो, या उपनिषदात शिष्याला गुरू परब्रह्माचे नाम सांगत आहेत. परब्रह्माकडे जाण्यास जी स्वाभाविकपणे साह्य करणारी आहेत अशी प्रतीके निवडावीत असा मात्र आग्रह आहे. इथे ऋषींनी सांगितलेले परब्रह्माचे 'तद्वनम्' हेही असेच खरे नाव आहे. तद्वनम् म्हणजे त्याचे वनम्, ते हे ब्रह्मच वन् आहे. त्याची वन् ह्या नावानेच उपासना करावी. वननीय म्हणजे भजनीय. ब्रह्माचे हे प्रसिद्ध नाव आहे. कारण ब्रह्म हे प्रत्यगात्म स्वरूप असल्याने ते त्यांचे भजनीय आहे. सर्व भूतांच्या अंतःकरणात प्रत्यगात्मा राहत असल्याने त्याला 'तद्वन' असे नाव आहे. तो सर्वांनाच पूजनीय आहे. वन ह्या नावाने असणाऱ्या ब्रह्माची तशी उपासना केल्याने ते भजनीय गुणाने युक्त असल्याने तेच फळ मिळते. परब्रह्मावर ज्या गुणांची कल्पना करून त्याची उपासना करावी त्याप्रमाणे त्याची फळे मिळतात. नामसाधना करीत असताना त्याच्या अर्थाचे चिंतन करावे व तसा भाव अंतरी जागवावा, असे या मंत्रात म्हटले आहे.

अशा नामोपाशनेचे फळही येथे सांगितले आहे. अशी साधना करणारा साधक सर्वांना प्रिय होतो. सर्व भजनीय परब्रह्माची उपासना करणारा साधक परब्रह्माशी एकरूप होतो. त्यामुळे परब्रह्म जसे सर्वांना प्रिय असते तसा हा साधकसुद्धा सर्वांना प्रिय होतो.

अशा प्रकारे या सर्व मंत्रातून ऋषी अनेक प्रकारच्या उपासना सुचवीत आहेत. कोणत्याही साधनेने का असेना पण आपल्या स्वरूपभूत परब्रह्माचे ज्ञान आपल्याला व्हावे म्हणून ऋषींचा हा उपदेश आहे.

**उपनिषदं भो ब्रूहीत्युक्ता त उपनिषद् ब्राह्मीं वाव त**
**उपनिषदमब्रूमेति ।।७।।**

**अन्वय**

भोः - हे गुरुदेवा
उपनिषदम् ब्रूहि इति - उपनिषदाचा उपदेश करा
(शिष्य असे म्हणाल्यावर गुरू उत्तरले)
ते उपनिषत् उक्ता - तुला उपनिषदविद्या सांगितली
वाव - खरोखरच
ते - तुला
ब्राह्मीम उपनिषदम् अब्रम इति - ब्रह्मविषयक उपनिषद्‌विद्या सांगून झाली आहे

### अर्थ

शिष्य गुरूला म्हणाला की, 'हे गुरो, मला उपनिषदाचा उपदेश करा.' त्यावर गुरू उत्तरले की, तुला उपनिषद्विद्या सांगून झाली आहे. अगदी निश्चयपूर्वक सांगतो ब्रह्मज्ञानाचे रहस्य सांगणारी उपनिषद्विद्या तुला सांगून झाली आहे.

**तस्यै तपो दमः कर्मेति प्रतिष्ठा वेदाः सर्वाङ्गानि**
**सत्यमायतनम् ।।८।।**

### अन्वय

तस्यै - त्या उपनिषद्विद्येचे
तपः दमः कर्म इति प्रतिष्ठा - तप, इंद्रियदमन आणि सत्कर्माचरण हे आधार आहेत
वेदाः सर्वाङ्गानि - वेद तिची सर्वांगे आहेत
सत्यम् आयतनम् - सत्य तिचे वासस्थान आहे

### अर्थ

त्या उपनिषद्विद्येचे आधार आहेत तप, इंद्रियदमन व सत्कर्माचरण. तसेच वेद तिची अंगे आहेत आणि तिचा निवास सत्यात असतो.

**यो वा एतामेवं वेदापहत्य पाप्मानमनन्ते स्वर्गे लोके ज्येथे**
**प्रतितिष्ठति प्रतितिष्ठति ।।९।।**

### अन्वय

यः वै - जो खरोखर
एताम् एवम् वेद - या ब्रह्मविद्येला अशा प्रकारे जाणतो (तो)
पाप्मानम् अपहत्य - पापांचा नाश करून
अनन्ते ज्येये स्वर्गे लोके - अनंत श्रेष्ठ अशा स्वर्ग लोकी
प्रतितिष्ठति - प्रतिष्ठित होतो
प्रतितिष्ठति - निश्चित प्रतिष्ठित होतो

### अर्थ

जो या ब्रह्मविद्येला अशा प्रकारे खरोखर जाणतो तो पापांचा नाश करून



अनंत अनिवासी सर्वश्रेष्ठ अशा स्वर्गलोकात प्रतिष्ठित होतो. तो खरोखरच तिथे प्रतिष्ठित होतो.

## उपनिषदाचा उपदेश

सातव्या मंत्रात शिष्य गुरूला म्हणतो, 'गुरुदेव मला उपनिषद सांगा' त्यावर गुरू म्हणतात, 'अरे, आतापर्यंत जे मी सांगितले ते सर्वकाही उपनिषदच होते.' वास्तविक शिष्याने अत्यंत जिज्ञासू वृत्तीने व मुमुक्षूच्या भूमिकेत अत्यंत तत्परतेने गुरूचा सर्व उपदेश ऐकला आहे. ऋषींनी शिष्याला ब्रह्माचे स्वरूप दाखविले आहे. त्या ब्रह्मविद्येचे साधनेसहित कथन केले आहे. ते सर्वातीत, सर्वगत, एकमेव, अद्वितीय परब्रह्मच अज्ञानामुळे 'मी व जग' या द्वैतरूपाने भासत आहे. अज्ञान दूर झाले की मी माझे हा भ्रम, मी जग ही द्वैत भावना निघून जाऊन तेथे सत्य प्रगटते. अशा प्रकारे ब्रह्मविद्या सांगून प्रतिकोपासना व नामसाधना यांचाही उपदेश गुरूंनी केला आहे.

असे असतानासुद्धा शिष्याने हा प्रश्न पुन्हा विचारला आहे. याचे एक कारण असे की, ब्रह्मज्ञान मिळविण्याचे काहीतरी एखादे साधन गुरूने सांगावे असे शिष्याला वाटते. वास्तविक ब्रह्मप्राप्ती ही स्वतंत्र अशा स्वरूपात कोठून प्राप्त होत नसते, कारण आत्मज्ञान हे नित्यप्राप्त व स्वयंबुद्धीने प्राप्त करायचे असते. ब्रह्मज्ञान कोणत्याही विशिष्ट साधनक्रियेने बाहेरून मिळवायची स्थिती नाही. कानाचा कान, डोळ्याचा डोळा अशा निरूपण पद्धतीने ब्रह्माचे वर्णन केल्यावर ते आता कसे जाणून घ्यावयाचे ते गुरूंना सांगावयाचे आहे. साधनेबद्दल कुतूहल असल्याने शिष्याने हा प्रश्न विचारला आहे आणि ती साधना म्हणजेच खरे उपनिषद असा या शिष्याचा भाव आहे. म्हणून ऋषी पुढच्या मंत्रात ही साधना सांगत आहेत.

ब्रह्मज्ञानासाठी तप, इंद्रिय संयम व नियतकर्माचे आचरण हे त्याचे आधार आहेत. ही जर साधने प्रत्यक्ष जीवनात आली नाहीत तर अंतःशुद्धी होणे शक्य नाही. अशुद्ध जीवनात ब्रह्मज्ञानाचा उदय होणे शक्य नाही. इंद्रिये व अंतःकरण तसेच मन ज्यामुळे शांत व संयमित होतात त्या ब्रह्मचर्यादिकानाच 'तप' असे म्हणतात. दम म्हणजे इंद्रियांना विषय भोगापासून परावृत्त करणे. बहिर्मुख इंद्रिये आपल्या पूर्वजन्मांच्या संस्कारामुळे सतत विषयाधीन होत असतात. सत्कर्मे म्हणजे शास्त्रांनी सांगितलेली विहीत कर्म तसेच चिंतन, मनन, ध्यान अशा तऱ्हेची कर्मे निःस्वार्थ बुद्धीने करणे. या तप, दम, कर्म साधनांनी चित्तशुद्धी होऊन ज्ञानाचा उदय होतो. अंतःकरणातील मळ, दोष

निघून गेल्यामुळे नित्यप्राप्त असे ब्रह्मज्ञान त्याला प्राप्त होते. ज्ञानाची खरी साधने म्हणजे भगवद्‌गीतेच्या तेराव्या अध्यायात वर्णन केलेली ज्ञानाची अठरा लक्षणे होत. अमानित्व - अदभित्व - अहिंसा - आचार्योपासना अशा प्रकारची लक्षणे जेव्हा अंतःकरणात प्रगट व्हायला लागतात त्याच वेळी ज्ञान विलसत असते. अशा साधनांनीच ब्रह्मज्ञान प्रकट होत असते. सत्य, प्रेम, अहिंसा ही सत्पुरुषांच्या ठायी पूर्णत्वाने विराजमान असतात. असे जे अंतःकरणाने शुद्ध झालेले सत्पुरुषच ब्रह्मविद्येचे अधिकारी आहेत. तप व कर्म यांनी वैराग्य प्राप्त होते व अशा वैराग्याने त्याला संसाराची आसक्ती राहत नाही. देह, वाणी व मन ही त्या ब्रह्माच्याच अनुसंधानात राहून वैराग्यामुळे त्या सत्याचाच ध्यास करीत असतात. चारही वेदांचा अभ्यास मुखोद्‌गत करून त्यांच्या अभ्यासाला गती येते, अशा वेळी सत्याला आश्रय मिळून तेथेच ते विराजमान राहते. सत्य हे सर्वश्रेष्ठ साधन असून त्याचे सतत अनुष्ठान केले असता अत्यंत पवित्र असे ब्रह्मरूप प्राप्त होते. सत्य हे ब्रह्मविद्येचे घर म्हटले जाते आणि असे हे ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यावर तो ज्ञानी अत्यंत आनंदमय परमलोकाला प्राप्त होतो. तो ज्ञानी ब्रह्मरूप होऊन सर्वभूताधिवासात असलेल्या ब्रह्माला जाणून ब्रह्मरूपच होतो.

जीवनाची कृतार्थता अशी ब्रह्मप्राप्ती होण्यातच आहे.

हे उपनिषद (केनोपनिषद) जो जाणतो त्याचे पाप नष्ट होऊन अविनाशी, सर्वश्रेष्ठ अशा स्वर्गात तो अनंत काळ राहतो.

o o o o o



# केनोपनिषद

## लेखक - परिचय

| | | |
|---|---|---|
| नाव | : | प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| जन्म | : | १९ जानेवारी १९४१ बेळगांव |
| शिक्षण | : | १) एम. ए. (इंग्रजी - संस्कृत)<br>२) एम. ए. (मराठी) |
| व्यवसाय | : | पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे व महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे अशी एकूण ४० वर्षे सेवा. गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. |
| छंद व आवड | : | • सतत भ्रमण - ५ वेळा अमेरिका-कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणचा प्रवास.<br>• वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन.<br>• निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.<br>• योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्याने व प्रात्यक्षिके. |
| सामाजिक कार्य | : | • श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशा संतसाहित्यावर व भगवद्‌गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.<br>• गीता व ज्ञानेश्वरी यावरील लेखमाला प्रसिद्ध.<br>• अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय |
| संपर्क | : | २४६ ए/ई, रत्नोदय सोसायटी, नागाळा पार्क, कोल्हापूर. ✆ : ०२३१-६५१०४४ |